सत्यमेव जयते

महाराष्ट्र शासन





# जलसंपदा व सार्वजनिक बांधकाम विभागातील अभियांत्रिकी सेवा नियमांच्या पुनर्रचनेसंदर्भात

## श्री. के. पी. बक्षी

प्रधान सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग

यांच्या अध्यक्षतेखालील समितीचा

# अहवाल

# जलसंपदा व सार्वजनिक बांधकाम विभागातील अभियांत्रिकी सेवा नियमांच्या पुनर्रचनेसंदर्भात श्री.के.पी.बक्षी, प्रधान सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग यांच्या अध्यक्षतेखालील समितीचा अहवाल

# अनुक्रमणिका

# प्रस्तावना

राजपत्रित अभियंता संघटना, महाराष्ट्र या संघटनेने शासनास सादर केलेल्या मागण्यांसंदर्भात मा. मुख्यमंत्री महोदय यांच्या अध्यक्षतेखाली दि.९.५.२००६ रोजी बैठक आयोजित करण्यात आली होती. या बैठकीमध्ये संघटनेने सादर केलेल्या मागण्यांमधील खाली नमूद केलेल्या मुद्दयांबाबत चर्चा झाली.

(१) अभियांत्रिकी पदवीधरांची विपुलता विचारात घेऊन शाखास्तरावरील सेवा भरतीचे पदवीधर (सहायक अभियंता श्रेणी-२) व पदविकाधारक (कनिष्ठ अभियंता) यांचे सध्याचे प्रमाण २५:७५ असे आहे ते बदलून ६०:४० असे ठेवणे.

(२) मुख्य अभियंता व अधीक्षक अभियंता यांच्या पी.ए. (स्वीय सहायक) ची अकार्यकारी पदे तसेच शाखा स्तरावरील शाखा अभियंत्यांच्या पदांचे उन्नयन करण्याची शक्यता तपासणे.

(३) यापुढे उप विभागीय स्तरावर उप अभियंता हे एकच नामाभिधान / पदनाम ठेवणे.

उपरोक्त मुद्यांच्या संदर्भात तपासणी करून शिफारशी करण्याबाबतची कार्यवाही करण्यासाठी अप्पर मुख्य /प्रधान सचिव (सेवा) सामान्य प्रशासन विभाग यांच्या अध्यक्षतेखाली समिती नेमण्याचे मा. मुख्यमंत्री महोदयांनी निदेश दिले.

मा. मुख्यमंत्री महोदयांच्या निदेशानुसार शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-१००६/(५६/२००६)/आ.(संनि) दि.११.७.२००६ अन्वये **(जोडपत्र १)** खालीलप्रमाणे समितीची स्थापना करण्यात आली :—

| | |
|---|---|
| प्रधान सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग | अध्यक्ष |
| सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, | सदस्य |
| सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, | सदस्य |
| सचिव (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, | सदस्य |
| सचिव (रस्ते), सार्वजनिक बांधकाम विभाग, | सदस्य |
| सह सचिव (सेवा), जलसंपदा विभाग, | सदस्य सचिव |

उपरोक्त शासन निर्णयानुसार समितीच्या कार्यकक्षेमधील खाली नमुद केलेल्या मुद्यांचा विचार करताना ज्या ज्या अभियंत्यांच्या सेवाविषयक बाबीमध्ये परिणाम संभवतो अशा सर्व मान्यताप्राप्त संघटनांचे अभिप्राय जाणून घेऊन संपूर्ण अभियांत्रिकी सेवेबाबत शिफारशी करावयाच्या होत्या.

(१) अभियांत्रिकी पदवीधरांची विपुलता विचारात घेऊन शाखास्तर व उप विभाग / विभाग स्तरावरील पदवीधरांचे भरती व पदोन्नतीचे प्रमाण कसे असावे.

(२) एकूण पद संख्या कायम ठेवून शाखा स्तरावरील व उप विभागावरील पदे लगतच्या उच्च स्तरावर दर्जोन्नत करून संवर्ग संख्या कशी असावी.

(३) सर्व साधारण धोरणानुसार उप विभागस्तरावर पदोन्नत व सरळ सेवा प्रविष्ठांचा एकच संवर्ग करावा किंवा कसे.

उपरोक्त मुद्यांबाबत मान्यताप्राप्त संघटनांचे म्हणणे ऐकून घेण्याकरिता समितीच्या अध्यक्षांनी केलेल्या सूचनांनुसार, जलसंपदा व सार्वजनिक बांधकाम या दोन्ही विभागांच्या सचिवांनी तसेच अध्यक्षांनी घेतलेल्या बैठकांचा तपशील सोबत जोडलेल्या गोषवाऱ्यामध्ये दर्शविला आहे.

सर्व मान्यताप्राप्त संघटनांनी त्यांच्याशी संबंधित मुद्यांबाबत मांडलेले म्हणणे तसेच सादर केलेली निवेदने यांचा समितीने काळजीपूर्वक विचार केला. त्याचप्रमाणे उपरोक्त मुद्यांबाबत प्रशासकीय विभाग म्हणून जलसंपदा व सार्वजनिक बांधकाम विभागांच्या सचिवांच्या सूचना / मतेसुद्धा समितीने जाणून घेतली.

समितीच्या विचारार्थ सोपविण्यात आलेले विषय, त्यास अनुसरून अभियांत्रिकी सेवेतील विविध मान्यताप्राप्त संघटनांनी समितीसमोर सादर केलेली निवेदने, जलसंपदा विभाग व सार्वजनिक बांधकाम विभागाने वेळोवेळी उपलब्ध करून दिलेली माहिती यांचा सर्वंकष अभ्यास व विचार करून हा सर्वसमावेशक अहवाल समितीने तयार केला असून तो समिती शासनास सादर करीत आहे.

**दिनांक ११ जुलै २००६ रोजीच्या शासन निर्णयान्वये अपर मुख्य/प्रधान सचिव (सेवा) यांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या समितीने तसेच समितीच्या अध्यक्षांनी केलेल्या सूचनांनुसार जलसंपदा विभाग व सार्वजनिक बांधकाम विभाग या दोन्ही विभागांच्या सचिवांनी घेतलेल्या बैठकींचा गोषवारा.**

| अ.क्र. (१) | बैठकीचे दिनांक (२) | बैठकीमधील निर्णयाचा थोडक्यात गोषवारा (३) |
|---|---|---|
| (१) | दिनांक १७.८.२००६ व २५.८.२००६ | अ.मु.स. (सेवा) श्री. नवीनकुमार आयोजित बैठक अपरिहार्य कारणास्तव होऊ शकली नाही. |
| (२) | दिनांक ६.१०.२००६ | अ.मु.स.(सेवा) श्रीमती झुत्शी यांचे अध्यक्षतेखाली पहिली बैठक झाली. या बैठकीमध्ये समिती समोर असलेल्या विषयांच्या बाबतीत विभागाने सादर केलेल्या अभिप्रायांच्या अनुषंगाने प्राथमिक स्वरुपाची चर्चा झाली. त्यानंतर अभियांत्रिकी सेवा वर्ग-१ व २ मधील अभियंत्याचे प्रतिनिधीत्व करणाऱ्या सर्व शासन मान्यता प्राप्त संघटनांचे अभिप्राय जलसंपदा व सार्वजनिक बांधकाम विभागाचे सचिवांनी जाणून घेऊन ते समितीसमोर सादर करण्याच्या सूचना अध्यक्षांनी दिल्या. |
| ३) | दिनांक २९.११.२००६ | सचिव (जलसंपदा), सचिव (लाक्षेवि) व सचिव (रस्ते) यांनी खाली नमूद मान्यताप्राप्त संघटनांची लेखी निवेदने घेऊन त्यांचे म्हणणे सुध्दा प्रत्यक्ष ऐकून घेतले :—<br>(१) राजपत्रित अभियंता संघटना, महाराष्ट्र<br>(२) कनिष्ठ अभियंता संघटना, महाराष्ट्र<br>(३) महाराष्ट्र राज्य स्थापत्य अभियांत्रिकी सहायक कर्मचारी संघटना<br>(४) महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा वर्ग-१ संघटना, नाशिक<br>(५) सरळ सेवा वर्ग-२, अभियांत्रिकी अधिकारी संघटना<br>(६) महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा संघटना. |
| (४) | दिनांक २५.१.२००७ | संघटनांनी सादर केलेले अभिप्राय अ.मु.स.(सेवा) यांच्या अध्यक्षतेखालील बैठकीमध्ये सादर करण्यात आले. त्यामध्ये अभियांत्रिकी संवर्गाशी संबंधित सहाही संघटनांनी त्यांच्याशी संबंधित मागण्यांबाबत त्यांना लाभदायक ठरतील असे अभिप्राय व्यक्त केले असल्याने प्रशासकीय हिताच्या दृष्टीने या सर्व मागण्यांचा समन्वय कसा साधता येईल याबाबत सचिव, सा.बां.वि. व सचिव, जलसंपदा यांनी प्रथम एकत्रित चर्चा करावी असे ठरले. |
| (५) | दिनांक १२.३.२००७ | सचिव, सा.बां.वि. व सचिव, जलसंपदा यांची आयोजित केलेली बैठक काही अपरिहार्य कारणास्तव होऊ शकली नाही, त्यानंतर अधिवेशन काळामुळे बैठक आयोजित होऊ शकली नाही. |
| (६) | दिनांक २०.६.२००७ | समितीचे अध्यक्ष अ.मु.स.(सेवा) यांनी सर्व मान्यताप्राप्त संघटनांचे म्हणणे प्रत्यक्ष ऐकून घेतले. व पुन्हा दोन्ही विभागाच्या सचिवांनी चर्चा करावी असे सूचित केले. तद्नंतर तत्कालीन अ.मु.स. (सेवा) श्रीमती झुत्शी यांची बदली झाल्याने त्यांचे जागी श्री. सतिश त्रिपाठी (भा.प्र.से) यांची पदस्थापना |

| अ.क्र. (१) | बैठकीचे दिनांक (२) | बैठकीमधील निर्णयाचा थोडक्यात गोषवारा (३) |
|---|---|---|
| | | झाल्यानंतर सदर प्रकरणाची वस्तुस्थिती त्यांच्या निदर्शनास आणण्यात आली. त्यावेळी त्यांनी सदर प्रकरणी ठरल्याप्रमाणे दोन्ही विभागाच्या सचिवांनी प्रथमतः एकत्रित चर्चा करून निर्णयाप्रत यावे व प्रस्ताव समितीसमोर सादर करण्याचे सुचविले. |
| (७) | दिनांक ५.१२.२००७ | सचिव, जलसंपदा व सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग यांची बैठक झाली. या बैठकीसाठी समिती समोरील विषयाबाबत विभागाचे अभिप्राय दर्शविणारी टिप्पणी तसेच संघटनांचे म्हणणे विचारात घेऊन सविस्तर चर्चा झाली. चर्चेमध्ये समिती समोरील तीन विषया व्यतिरिक्त अभियांत्रिकी सेवा संघटनांनी सादर केलेल्या निवेदनातील दोन विषय विचारात घ्यावेत, असे ठरले. सदर विषय खालीलप्रमाणे :— <br> (१) सेवेमध्ये असलेल्या अभियंत्यांना अभियांत्रिकी सेवा वर्ग-१ व वर्ग-२ करिता सरळसेवेने लोकसेवा आयोगाच्या स्पर्धा परिक्षेमार्फत होणाऱ्या नेमणुकीसाठी परिक्षेस बसण्यास वयाची अट पूर्णपणे शिथिल करणे. <br> (२) सेवेतील ए.एम.आय.ई. धारकांसाठी ३/८ सेवेचा लाभ पुढे सुरु ठेवणे आणि त्याचबरोबर त्यांच्या करिता स्वतंत्र संवर्ग निर्माण करणे व त्यांना उप विभागीय अभियंता तसेच कार्यकारी अभियंता या पदावर पदोन्नतीसाठी स्वतंत्र कोटा ठेवणे. <br> वरील विषयांच्या अनुषंगाने सदर बैठकीत सविस्तर चर्चा करण्यात आली. मात्र भरती/पदोन्नतीच्या प्रमाणा संदर्भात पुढील मुद्यांबाबत माहिती घेऊन ती पुढील बैठकीत सादर करण्याचे ठरले :— <br> (१) आयएएस/आयपीएस/आयएफएस मधील थेट व पदोन्नतीने भरतीचे प्रमाण. <br> (२) राजपत्रित वर्ग-१ व वर्ग-२ मधील सेवा भरती संदर्भात भारताच्या संविधानातील तरतुदी. <br> (३) सरळसेवा भरती व पदोन्नतीच्या प्रमाणासंदर्भात शासनाचे सर्वसाधारण धोरण आदेश/नियम. <br> (४) केंद्र शासनाच्या जलसंपदा मंत्रालयातील तसेच सार्वजनिक बांधकाम खात्यातील वर्ग-१ व वर्ग-२ मधील सरळसेवा भरतीबाबतचे नियम. <br> (५) इतर राज्यांमधील अभियांत्रिकी सेवा वर्ग-१ व वर्ग-२ मधील सरळ सेवा भरती व पदोन्नतीच्या प्रमाणासंदर्भात आदेश/नियम/धोरण ; <br> त्याचबरोबर संघटनांनी सादर केलेल्या ५ मागण्यांव्यतिरिक्त जलसंपदा व सार्वजनिक बांधकाम विभागांनी अभियांत्रिकी सेवेतील गट-अ आणि गट-ब मधील पदांसंदर्भात सध्या अस्तित्वात असलेले सेवा नियमा व्यतिरिक्त अन्य काही बाबी मुद्दे असल्यास तेही समितीसमोर मांडावेत. |

| अ.क्र. (१) | बैठकीचे दिनांक (२) | बैठकीमधील निर्णयाचा थोडक्यात गोषवारा (३) |
|---|---|---|
| (८) | दिनांक ५.१२.२००८ | गुजरात, तामिळनाडू, कर्नाटक व केंद्र शासनाकडून दि. १.१.२००८ रोजीच्या पत्रान्वये माहिती मागविण्यात आली. सातत्याने पाठपुरावा केल्यानंतर वरील तीन राज्यांच्या व केंद्र शासनाच्या सार्वजनिक बांधकाम विभागातील तसेच केंद्राच्या जलसंपदा मंत्रालयाची माहिती जून, २००८ पर्यंत प्राप्त झाली. सदरहू माहिती संकलित **(जोडपत्र-३)** करून दोन्ही विभागांच्या सचिव महोदयांच्या बैठकीत विचारार्थ ठेवण्यात आली. याबाबत सांगोपांग विचार करून काही मुद्यांच्या अनुषंगाने अधिक माहिती पुढील बैठकीत ठेवावी असे ठरले. |
| (९) | दिनांक २१.४.२००९ | दोन्ही विभागांच्या सचिवांच्या बैठकीत मागील दि. ५.१२.२००८ च्या बैठकीत ठरल्याप्रमाणे सर्व माहिती ठेवण्यात आली. त्यावर समिती समोरील विषयांच्या अनुषंगाने दोन्ही विभागांच्या सचिव स्तरावर समिती समोर सादर करावयाचे अभिप्राय अंतिम केले. |
| (१०) | दिनांक १.८.२००९ | पदे उन्नयन करण्याच्या संघटनेच्या मागणी संदर्भात दोन्ही विभागांच्या सचिवांच्या बैठकीमध्ये चर्चा होऊन शाखा अभियंत्यांच्या काही पदांचे उन्नयन करण्याचा निर्णय घेण्यात आला. |
| (११) | दिनांक ३०.९.२००९ | दोन्ही विभागांच्या सचिवांनी समिती समोरील विषयांच्या अनुषंगाने आवश्यक ती माहिती एकत्रित करून व वर नमूद केलेल्या बैठकांमध्ये विचारविनिमय करून तयार केलेले अभिप्राय श्री. के. पी. बक्षी, प्रधान सचिव (सेवा) सामान्य प्रशासन विभाग यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या बैठकीमध्ये सादर केले त्यावर सविस्तर चर्चा होऊन काही मुद्यांबाबत अतिरिक्त माहिती दोन्ही विभागांच्या सचिवांनी विचार विनिमय करून पुढील बैठकीमध्ये सादर करावे असे अध्यक्षांनी सूचित केले. |
| (१२) | दिनांक १४.१०.२००९ | जलसंपदा व सार्वजनिक बांधकाम या दोन्ही विभागांच्या सचिवांची बैठक झाली व वरील प्रमाणे समिती समोर ठेवावयाची अतिरिक्त माहिती अंतिम करण्यात आली. |
| (१३) | दिनांक ११.१.२०१० | दि. १४.१०.२००९ रोजी झालेल्या बैठकीत अतिरिक्त माहितीबाबत अंतिम केलेले अभिप्राय प्रधान सचिव (सेवा) सामान्य प्रशासन विभाग यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या बैठकीमध्ये सादर करण्यात आले. त्यावर सविस्तर चर्चा होऊन समितीने प्रस्तावाला अंतिम स्वरुप दिले. |

## समितीच्या विचारार्थ ठेवण्यात आलेले विषय, त्यावरील शासन मान्यताप्राप्त संघटनांचे मुद्देनिहाय अभिप्राय, विभागाचे अभिप्राय व समितीच्या शिफारशी

समितीच्या विचारार्थ सोपविण्यात आलेले विषय, त्यास अनुसरुन अभियांत्रिकी सेवेतील विविध मान्यता प्राप्त संघटनांनी समितीसमोर मांडलेले त्यांचे म्हणणे, तसेच जलसंपदा विभाग व सार्वजनिक बांधकाम विभागांच्या सचिवांनी या विषयासंदर्भात समितीसमोर सादर केलेले अभिप्राय व वेळोवेळी विभागाने समिती समोर सादर केलेली संबंधित कागदपत्रे यांचा सर्वंकष अभ्यास करून समितीने या प्रकरणी ठोस निष्कर्ष नोंदवून त्या अनुषंगाने यथायोग्य शिफारशी करण्याचे ठरविले.

२. समितीसमोर विचारार्थ ठेवलेले विषय, त्यावरील संघटनांचे अभिप्राय, विभागाचे अभिप्राय यांचा गोषवारा, समितीचे निष्कर्ष व शिफारशी पुढीलप्रमाणे आहेत.

३. **विषय क्रमांक १.—अभियांत्रिकी पदवीधरांची विपुलता विचारात घेऊन शाखास्तर व उप विभाग/विभाग स्तरावरील पदवीधरांचे भरती व पदोन्नतीचे प्रमाण कसे असावे.**

### ३.१ संघटनांचे अभिप्राय

### ३.१.१ राजपत्रित अभियंता संघटना

**(अ) शाखास्तर**

(१) पदवीधर स.अ. श्रेणी २ भरतीचे प्रमाण ७५% किंवा कमीतकमी ६०% ठेवावे.

(२) पदवीकाधारक कनिष्ठ अभियंता भरती/पदोन्नतीचे प्रमाण २५% किंवा जास्तीत जास्त ४०% ठेवावे.

(३) याव्यतिरीक्त सदर संघटनेने खालील अभिप्राय देखील नोंदविलेले आहेत.

कनिष्ठ अभियंता ते स.अ.श्रेणी-२ समावेशन :

ए.एम.आय.ई. : लोकसेवा आयोगाची परीक्षा उत्तीर्ण झाल्याच्या तारखेपासून किंवा

ए.एम.आय.ई. झाल्याच्या तारखेपासून ५ वर्षांनी स.अ.श्रेणी २ संवर्गात घ्यावे.

**(ब) उप विभागस्तर**

(१) उप विभागावरील सरळ सेवा भरती बंद करावी.

(२) स.अ.श्रेणी-२ पदावरून उप अभियंता पदावर पदोन्नतीसाठी ६७% कोटा ठेवावा.

**(क) विभागस्तर**

(१) विभागीय स्तरावर फक्त पदवीधरांनाच पदोन्नती देण्यात यावी.

**(ड) मंडळ व त्यावरील स्तर**

अधीक्षक अभियंता पदावर ५०% पदे व मुख्य अभियंता पदावर ७०% पदे स.का.अ. या संवर्गाला मिळतील या बेताने भरतीचे प्रमाण ठरवावे. उर्वरित पदे पदोन्नत पदवीधरांना देण्यात यावीत.

### ३.१.२ कनिष्ठ अभियंता संघटना

**(अ) शाखास्तर**

(१) सहायक अभियंता श्रेणी-२ (सेवेत राहून पदवी प्राप्त अभियंत्यासह) यांच्याकरिता सरळ सेवा भरतीचे प्रमाण २५% ठेवावे.

(२) पदविकाधारक कनिष्ठ अभियंता / शाखा अभियंता यांचे प्रमाण ७५% ठेवावे.

**(ब) उप विभागस्तर**

(१) उप विभागीय अभियंता पदावरील पदोन्नतीसाठी ३३% प्रमाण ठेवावे.

(२) उप विभागीय अधिकारी या पदावरील पदोन्नतीसाठी ६७% प्रमाण ठेवावे.

**(क) विभागस्तर**

(१) उप विभागीय अभियंता पदावरून कार्यकारी अभियंता या पदावरील पदोन्नतीसाठी ३०% प्रमाण ठेवावे.

(२) उप विभागीय अधिकारी पदावरून कार्यकारी अभियंता या पदावरील पदोन्नतीसाठी ३०% प्रमाण ठेवावे.

(३) सहायक कार्यकारी अभियंता पदावरून कार्यकारी अभियंता या पदावरील पदोन्नतीसाठी ४०% प्रमाण ठेवावे.

**(ड) मंडळ व त्यावरील स्तर**

(१) कार्यकारी अभियंता पदवीधर संवर्गातून अधीक्षक अभियंता पदावरील पदोन्नतीसाठी ९०% प्रमाण ठेवावे.

(२) कार्यकारी अभियंता पदविकाधारक संवर्गातून अधीक्षक अभियंता पदावरील पदोन्नतीसाठी १०% प्रमाण ठेवावे.

**३.१.३ महाराष्ट्र राज्य स्थापत्य अभियांत्रिकी सहायक संघटना**

**(अ) शाखास्तर**

(१) सहायक अभियंता श्रेणी-२ सरळ सेवा भरतीचे प्रमाण २५% ठेवावे.

(२) पदविकाधारक कनिष्ठ अभियंत्यांचे भरतीचे प्रमाण ७५% ठेवावे (त्यामध्ये दोन्ही विभागांत या संवर्गात द्यावयाच्या पदोन्नतीचे प्रमाण (७५% क.अ.च्या) २०% व ५% असे २५% नुकतेच (दि. २९.३.२००६) केले आहे. ते आहे तसेच ठेवावे.)

सदरहू संघटनेचे उप विभागस्तर, विभागस्तर व मंडळ स्तरासाठी कोणतेही अभिप्राय नाहीत.

**३.१.४ महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा (वर्ग-१) संघटना**

**(अ) शाखास्तर**

अभिप्राय नाहीत.

**(ब) उप विभागस्तर**

(१) सहायक कार्यकारी अभियंता पदावरील सरळ भरतीचे प्रमाण ६०% करावे.

**(क) विभागस्तर**

(१) सहायक कार्यकारी अभियंता पदावरील सरळ भरतीचे प्रमाण ६०% करावे.

**(ड) मंडळ व त्यावरील स्तर**

अभिप्राय नाहीत.

**३.१.५ सरळ सेवा वर्ग-२ अभियांत्रिकी अधिकारी संघटना**

**(अ) शाखास्तर**

(१) पदवीधर स.अ.श्रेणी २ भरतीचे प्रमाण ५०% ठेवावे.

(२) कनिष्ठ अभियंता भरतीचे प्रमाण ५०% ठेवावे (२५% पदवीधर व २५% पदविकाधारक). कनिष्ठ अभियंता पदासाठी किमान शैक्षणिक अर्हता पदविका असावी.

**(ब) उप विभागस्तर**

(१) सरळ सेवा सरळ भरतीमध्ये सहायक कार्यकारी अभियंता ३% व सहायक अभियंता श्रेणी-१ चे ३१% हे प्रमाण ठेवावे.

(२) उप विभागीय अभियंता पदावरील पदोन्नतीसाठी ३३% प्रमाण ठेवावे.

(३) उप विभागीय अधिकारी या पदावरील पदोन्नतीसाठी ३३% प्रमाण ठेवावे.

**(क) विभागस्तर**

(१) सहायक कार्यकारी अभियंता पदावरून कार्यकारी अभियंता या पदावरील पदोन्नतीसाठी १३% प्रमाण ठेवावे.

(२) सहायक अभियंता श्रेणी-१ संवर्गातून कार्यकारी अभियंता या पदावरील पदोन्नतीसाठी ५२% प्रमाण ठेवावे.

(३) उप अभियंता पदावरून पदोन्नतीसाठी पदवीधर संवर्गातून पदोन्नतीकरीता २५% प्रमाण ठेवावे.

(४) उप विभागीय अधिकारी पदावरून पदोन्नतीसाठी पदवीकाधारक संवर्गातून पदोन्नतीकरीता १०% प्रमाण ठेवावे.

**(ड) मंडळ व त्यावरील स्तर**

(१) सहायक कार्यकारी अभियंता पदावरून पदोन्नत झालेल्या कार्यकारी अभियंत्यांना, अधीक्षक अभियंता पदावरील पदोन्नतीसाठी २५% प्रमाण ठेवावे.

(२) सहायक अभियंता श्रेणी-१ पदावरून पदोन्नत झालेल्या कार्यकारी अभियंत्यांना, अधीक्षक अभियंता पदावरील पदोन्नतीसाठी ७५% प्रमाण ठेवावे.

**३.१.६ महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा संघटना**

**(अ) शाखास्तर**

(१) शासन सेवेत पदवीधर अभियंत्यांची गरज विचारात घेऊन पदवीधर व अ-पदवीधरांचे प्रमाण निश्चित करावे, शाखास्तरावर स.अ.श्रे-२ विभागीय असा संवर्ग शासन सेवेत पदवी प्राप्त केलेल्या अभियंत्यांसाठी निर्माण करावा.

**(ब) उप विभागस्तर**

(१) स.अ.श्रेणी-१ संवर्गातील सरळसेवा भरती ७% प्रमाण ठेवावे.

(२) स.अ.श्रेणी-२ पदावरून पदोन्नत होणाऱ्या अभियंत्याकरिता ४०% प्रमाण ठेवावे (त्यामध्ये शासकीय सेवेत असताना पदव्युत्तर पदवी (एम.ई.) प्राप्त करणाऱ्या अभियंत्याकरिता ७% प्रमाणे ठेवावे.)

(३) स.अ.श्रेणी-२ (विभागीय), ( सेवेत असताना ए.एम.आय.ई./ तत्सम अर्हता प्राप्त करणारे पदविकाधारक अभियंते) २०% प्रमाण ठेवावे.

(४) उ.वि.अधिकारी (पदविकाधारक- कनिष्ठ अभियंता/ शाखा अभियंता यांच्या पदोन्नतीने) ३३%.

**(क) विभागस्तर**

(१) सहायक कार्यकारी अभियंता - २५% सरळसेवा भरतीने (यापैकी १०% शासन सेवेतील अभियंत्यांकरिता वयाची अट रद्द करून )

(२) सहायक अभियंता श्रेणी १ मधील अधिकाऱ्यांकरिता २०%.

(३) उप विभागीय अभियंता २५% (उप विभागीय अभियंता व स.अ.श्रे-१ संयुक्त संवर्ग ४५%).

(४) उप विभागीय अधिकारी १०%.

(५) २०% (सहायक अभियंता श्रेणी-१ (विभागीय) शासन सेवेत असताना ए.एम. आय. ई. करणाऱ्या अभियंत्यांच्या संवर्गासाठी.

**(ड) मंडळ व त्यावरील स्तर**

अभिप्राय नाहीत.

**३.२ विभागाचे अभिप्राय**

**३.२.१ (अ) शाखास्तर** : सध्या शाखास्तरावरील सेवा भरती दि. १९.१२.१९७० च्या सेवाप्रवेश नियमातील तरतुदीनुसार पदवीधर २५% व पदविकाधारक ७५% अशी करण्यात येते. सदर प्रमाण १९७० मध्ये ठरविण्यात आलेले आहे. त्यावेळी पदवीधरांची उपलब्धता पदविकाधारकांच्या तुलनेत अत्यंत कमी होती. त्यामुळे पदवीधरांचे प्रमाण त्यावेळी २५% असे ठेवण्यात आलेले आहे. या निर्णयाला आता सुमारे ३५ वर्षांचा काळ लोटलेला आहे. आता कालौघात झालेल्या बदलामुळे पदवीधरांची विपुलता आणि उपलब्धता ही मोठया प्रमाणावर वाढलेली आहे. त्या अनुषंगाने दि. ३०.९.२००९ रोजी समितीच्या बैठकीत झालेल्या चर्चेनुसार, उच्च व तंत्र शिक्षण विभागाकडून राज्यातील शासकीय आणि खाजगी अभियांत्रिकी/तंत्रनिकेतन महाविद्यालयातील गेल्या ३ वर्षात सर्वसाधारणपणे किती स्थापत्य पदवीधारक / पदविकाधारक उत्तीर्ण होऊन बाहेर पडले आहेत, याबाबतची माहिती प्राप्त करून घेण्यात आली. त्यानुसार सन २००८-०९ मध्ये २५०५ पदवीधर आणि ४७१७ पदविकाधारक उत्तीर्ण होऊन बाहेर पडले आहेत, त्यानुसार सदर प्रमाण साधारणतः १:२ असे आहे.

**३.२.२** त्याचप्रमाणे सध्याच्या उदारीकरण, खाजगीकरण आणि जागतिकीकरणाच्या युगात (Era of Liberalization, Privatization and Globalization ) रस्ते, वीज व पाणी या पायाभूत सोयीसुविधांची कामे मोठया प्रमाणात खाजगी क्षेत्राकडून केली जातात. गृहनिर्माण व इतर क्षेत्रामध्ये देखील मोठया प्रमाणात स्थापत्य इंजिनियर्स लागतात. त्याचबरोबर राज्य शासनाच्या ग्रामविकास विभाग, पाणीपुरवठा, नगर विकास, उद्योग इ. अनेक विभागांमध्ये आणि शासकीय / निमशासकीय महामंडळे व बोर्ड ह्यांना देखील मोठ्या प्रमाणात अभियंत्यांची आवश्यकता असते. त्यामुळे शासकीय आणि खाजगी अभियांत्रिकी व तंत्रनिकेतन महाविद्यालयामधून पदवीधर व पदविकाधारक अभियंते दरवर्षी बाहेर पडत असले तरी, सर्वच अभियंते सार्वजनिक बांधकाम विभाग व जलसंपदा विभागामध्ये येतात असे नाही.

**३.२.३** जलसंपदा विभाग आणि सार्वजनिक बांधकाम विभाग हे दोन्ही विभाग जनतेशी थेट संबंध येणारे विभाग आहेत व हे विभाग मुलभूत सोयीसुविधा (Infrastructural Facilities) उपलब्ध करून देणारे विभाग आहेत. विकास प्रकल्पांचे नियोजन, सर्वेक्षण, अन्वेषण, संकल्पन, प्रकल्प अहवाल तयार करणे आणि त्यानंतर प्रत्यक्ष दूरवरच्या किंवा दुर्गम क्षेत्रामध्ये विकास प्रकल्पांची अंमलबजावणी करणे इत्यादी महत्वाची कामे या विभागाकडून केली जातात. त्यासाठी कनिष्ठ अभियंता हा एक महत्वाचा पायाभूत घटक आहे. त्यामुळे शासन सेवेतील स्थापत्य अभियांत्रिकीच्या कामाची गरज विचारात घेता अधिकाधिक प्रमाणामध्ये पदवीधर अभियंत्यांची नेमणूक शासन सेवेत होणे आवश्यक आहे. आधुनिक तंत्रज्ञान आणि अभियांत्रिकी कामांबाबतची अद्यावत माहिती असणा-या अभियांत्रिकी पदवीधरांची शासन सेवेत मोठया प्रमाणावर भरती केल्यास पायाभूत विकास कामे आवश्यक गतीने व अधिक गुणवत्तापूर्वक पूर्ण करण्यास निश्चितच मदत होईल. शासनाच्या कामकाजासाठी उच्च शैक्षणिक अर्हता व गुणवत्ता संपादन केलेले पदवीधर अभियंते आता मोठया प्रमाणात उपलब्ध होऊ शकतात ही वस्तुस्थिती आहे. त्यामुळे विभागाच्या अत्यंत महत्वाच्या विकास कामात गतीमानता व गुणवत्ता राखण्याच्या दृष्टीकोनातून पदवीधरांच्या सेवा स्वीकारणे शासन व लोकहिताच्या दृष्टीने आवश्यक वाटते. त्यामुळे पदवीधरांचे सध्याचे प्रमाण २५% वरून ५०% करावे व पदवीकाधारकांचे प्रमाण ७५% वरून ५०% करावे असे प्रस्तावित करण्यात येत आहे.

**३.२.४** सध्याच्या प्रमाणानुसार पदविकाधारक कनिष्ठ अभियंत्यांचा ७५% कोटा आहे. त्यामध्ये (७५ हे १००% धरून) ७५% पदे पदविकाधारकांच्या नेमणुकीने थेट भरतीद्वारे भरली जातात व २५% पदे पदोन्नतीने भरली जातात. ही २५% पदोन्नतीची पदे स्थापत्य अभियांत्रिकी सहायक संवर्गातून ५% प्रमाणात अंशकालीन पदविकाधारकांमधून तर उर्वरीत २०% पदे अन्य अर्हताधारकामधून पदोन्नतीने भरण्यात येतात. आता वर नमूद केल्याप्रमाणे पदवीधर व पदविकाधारक

यांचे प्रमाण ५०:५० असे करावयाचे असल्याने ५०% पदविकाधारकांच्या कोटयामध्ये (५० हे १००% धरून ) ८५% पदे पदविकाधारकांच्या नेमणुकीने थेट भरतीद्वारे भरण्यात यावीत व १५% पदे पदोन्नतीने भरण्यात यावीत, त्यामध्ये स्थापत्य अभियांत्रिकी सहायक या संवर्गातून ५% पदे अंशकालीन पदविकाधारकांमधून तर उर्वरीत १०% अन्य अर्हताधारकांमधून पूर्वीप्रमाणे पदोन्नतीने भरण्यात यावीत. .

**३.२.५ (ब) उप विभागस्तर** : उप विभागस्तरावरील सेवा भरती दि.१९.१२.१९७० च्या सेवाप्रवेश नियमातील तरतुदीनुसार पुढील प्रमाणे करण्यात येते.

| अ.क्र. | पद | टक्केवारी |
|---|---|---|
| १ | स.अ.श्रेणी-१ (सरळसेवा भरती) | ३४% |
| २ | उप विभागीय अभियंता (स.अ.श्रेणी-२ - पदोन्नती) | ३३% |
| ३ | उप विभागीय अधिकारी (शाखा अभियंता-पदोन्नती) | ३३% |
| | एकूण | १००% |

**३.२.६** त्याशिवाय उप विभागस्तरावर कार्यकारी अभियंता संवर्गाच्या ४० टक्के पदे सहायक कार्यकारी अभियंता संवर्गात महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत सरळसेवेने भरली जातात.

**३.२.७** उपरोक्त प्रमाणामधील सहायक अभियंता श्रेणी-१ या संवर्गातील सरळसेवा भरती पूर्णतः बंद करावी असे राजपत्रित अभियंता संघटना व कनिष्ठ अभियंता संघटनेची मागणी आहे. तसेच इतर संघटनांनीही या सरळसेवा भरतीचे प्रमाण कमी करावे असे सुचविलेले आहे. संघटनांच्या या सूचनांचा विचार करता प्रशासकीय हिताच्या दृष्टीकोनातून सरळसेवा भरती पूर्णतः बंद करणे योग्य होणार नाही, कारण सार्वजनिक बांधकाम व जलसंपदा विभाग हयांचेमार्फत हाती घ्यावयाची विविध विकास कामे नवीन संकल्पना असणारे तरुण व हुशार अभियंत्यामार्फत पार पाडणे व त्याद्वारे प्रशासकीय कार्यक्षमता टिकविणे, वाढविणे आवश्यक आहे. त्यामुळे सरळसेवा भरतीचे प्रमाण कमी करणेबाबत विचार करण्यात आला. त्याशिवाय पदविकाधारक कनिष्ठ अभियंता हयांचे भरतीचे प्रमाण कमी केल्याने त्याप्रमाणात ह्या विभागातील उप विभागीय अधिकारी संवर्गातील पदोन्नतीचे प्रमाण कमी करण्याचे प्रस्तावित करण्यात येत आहे. पदवीधारकांचे शाखास्तरावरील प्रमाण वाढविल्याने त्याप्रमाणात त्यांचा उप विभाग स्तरावरील पदोन्नतीचे प्रमाण (Quota) वाढविणे आवश्यक वाटते. त्यानुसार उप विभागस्तरावर पुढीलप्रमाणे भरती / पदोन्नतीचे प्रमाण ठेवण्याचे प्रस्तावित करण्यात येत आहे.

| अ.क्र. | पद | सध्याची टक्केवारी | सुधारीत टक्केवारी |
|---|---|---|---|
| १ | स.अ.श्रेणी-१ (सरळसेवा भरती) | ३४% | २५% |
| २ | उप विभागीय अभियंता (स.अ.श्रेणी-२ - पदोन्नती) | ३३% | ५०% |
| ३ | उप विभागीय अधिकारी (शाखा अभियंता-पदोन्नती) | ३३% | २५% |
| | एकूण | १००% | १००% |

**३.२.८** त्याचप्रमाणे उप विभागस्तरावर कार्यकारी अभियंता संवर्गाच्या ४० टक्के इतकी पदे सहायक कार्यकारी अभियंता संवर्गात भरण्याच्या प्रमाणात व्यापक प्रशासकीय व तांत्रिक हित विचारात घेता बदल करण्याची आवश्यकता नाही.

**३.२.९** तसेच सहायक कार्यकारी अभियंता पदावर उच्च गुणवत्ता प्राप्त उमेदवार निवडले जावेत यासाठी त्या पदावरील उमेदवारांच्या निवडीची किमान अर्हता पात्रता ५५ टक्क्यावरून ६५ एवढी करण्याच्या दृष्टीकोनातून तपासणी करण्याच्या संदर्भात समितीच्या दि.३०.९.२००९ च्या बैठकीत झालेल्या चर्चेनुसार महाराष्ट्र लोकसेवा आयोगातील संबंधित उप सचिवांशी चर्चा केली. चर्चेमध्ये असे अवगत करण्यात आले की स.का.अ. या पदावरील नेमणुकीसाठीची पात्रता स्पर्धात्मक परिक्षेमध्ये उच्चतम गुण प्राप्त करणाऱ्या उमेदवारांमधून निश्चित केली जाते. अशी पात्रता निश्चित करताना

सदर पदांसाठी मागविण्यात आलेले एकूण उमेदवार विचारात घेतले जातात व त्यानुसार सर्वात अधिक गुण प्राप्त करणारा प्रथम या तत्वाप्रमाणे मागविण्यात आलेल्या एकूण उमेदवारांपैकी शेवटच्या उमेदवारास प्राप्त होणारे गुण ही सदर पदावरील नियुक्ती बाबतची कटऑफ रेषा समजली जाते. अशी गुणवत्ता प्रत्येक प्रवर्गासाठी (खुला, अ.जा., अ.ज. इ.) वेगवेगळी असते.

**३.२.१०** मात्र काही वर्षापूर्वी सहायक अभियंता श्रेणी-१ व सहा. कार्यकारी अभियंता या पदासाठी किमान अर्हता अनुक्रमे ४५ व ५५ टक्के अशी होती व त्या निकषानुसार महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून निवड प्रक्रिया पार पाडली जात होती. परंतु वर स्पष्ट केल्याप्रमाणे आता महाराष्ट्र लोकसेवा आयोग त्या-त्या वेळी मागणी केलेली पदे व उमेदवारांची उपलब्धता यांचा विचार करून वर नमूद केल्याप्रमाणे कट ऑफ रेषा गुणवत्तेसाठी निश्चित करते. सदर बाब विचारात घेता या पदासाठीची किमान अर्हता ६० टक्के अशी निश्चित करणे उचित ठरणार नाही. अशी साचेबध्द (रिजिड) अर्हता निश्चित केल्यास उमेदवार उपलब्ध होणे अडचणीचे ठरू शकते. अशा परिस्थितीत साचेबध्दपणे किमान अर्हता ठरविणे योग्य होणार नाही.

**३.२.११** **(क) विभागस्तर** : सध्याच्या नियमानुसार विभागस्तरावरील पदोन्नतीचे प्रमाण पुढीलप्रमाणे आहे.

| अ.क्र. | पद | टक्केवारी |
|---|---|---|
| १ | सहायक कार्यकारी अभियंता | ४०% |
| १ | स.अ.श्रेणी-१ (सरळसेवा भरती) | २५% |
| २ | उप विभागीय अभियंता (स.अ.श्रेणी-२ - पदोन्नती) | २५% |
| ३ | उप विभागीय अधिकारी (शाखा अभियंता-पदोन्नती) | १०% |
| | **एकूण** ... | १००% |

**३.२.१२** समिती समोर विचारार्थ असलेल्या मुद्दा क्रमांक ३ सर्वसाधारण धोरणानुसार उप विभागस्तरावर पदोन्नत व सरळसेवा प्रविष्टांचा एकच संवर्ग असावा याबाबत चर्चा झाली. इतर जवळपास सर्वच संवर्गात सरळसेवा व पदोन्नत अधिकाऱ्यांची त्या त्या तारखेपासून जेष्ठता निश्चित करून एकत्र संवर्ग विचारात घेऊन त्याआधारे पुढील सेवाविषयक लाभ दिले जातात. त्याच धर्तीवर उप विभागस्तरावर पदोन्नत व सरळसेवा अभियंत्यांचा एकच संवर्ग तयार करून कार्यकारी अभियंता पदावरील पदोन्नतीचे प्रमाण एकत्रितरित्या ५३% (२५+२५+३) इतके करण्याचे प्रस्तावित करण्यात येत आहे. पदविकाधारक कनिष्ठ अभियंत्यांचे भरतीचे प्रमाण कमी करण्यात येत असल्याने त्या प्रमाणात उप विभागस्तरावरील व विभागस्तरावरील पदोन्नतीचे प्रमाण देखील कमी करावयाचे आहे. त्या अनुषंगाने त्यांचे कार्यकारी अभियंता पदावरील पदोन्नतीचे प्रमाण ३% कमी करून ते पदवीधरांच्या सामाईक संवर्गाच्या कार्यकारी अभियंता पदावरील पदोन्नतीसाठी वर नमुद केल्याप्रमाणे (२५+२५+३) दयावे.

**३.२.१३** उपरोक्त अभिप्रायांच्या अनुषंगाने दि.३०.९.२००९ रोजीच्या समितीच्या बैठकीत चर्चा होऊन अध्यक्षांनी पुढील बाबींची तपासणी करून अभिप्राय दयावेत असे सूचित केले होते.

**३.२.१४** " पदविकाधारक अभियंत्यांची स्थापत्य अभियांत्रिकी सहायक, कनिष्ठ अभियंता, शाखा अभियंता, उप विभागीय अधिकारी आणि कार्यकारी अभियंता यामधील संख्या पहाता यांच्यामध्ये कार्यकारी अभियंता या पदावर पदोन्नतीसाठी १००० पदविकाधारकांसाठी १ असे प्रमाण येते त्यामध्ये पदविकाधारक अभियंत्यांना उच्च स्तरावरून कार्यकारी अभियंता पदावर पदोन्नतीच्या अधिक संधी कशा देता येऊ शकतील हे तपासावे. असे करताना सहायक कार्यकारी अभियंत्यांसाठी असलेले सध्याचे ४० टक्के प्रमाण २५ टक्के करावे व राहिलेले १५ टक्के प्रमाण पदोन्नतीसाठी देण्याबाबत शक्यता तपासण्यात यावी, असे करताना शासन सेवेत नेमणुका करताना व उच्च पदावर पदोन्नती देताना त्या पदावर कार्यरत राहणाऱ्या अधिकाऱ्यांची गुणवत्ता प्रथम दर्शनी विचारात घ्यावीच पण त्याचबरोबर शासन सेवेत येणाऱ्या कर्मचाऱ्यांना अधिक चांगले सेवा विषयक लाभ कसे देता येतील या बाबींचा विचार करून अभिप्राय द्यावेत. (Striking a balance between Merit & good service conditions)"

**३.२.१५** उपरोक्त मुद्यांच्या संदर्भात दोन्ही विभागाच्या सचिवांच्या दि. १४.१०.२००९ रोजी झालेल्या बैठकीत सविस्तर चर्चा होऊन पुढील प्रमाणे अभिप्राय देण्यात आले.

**३.२.१६** "महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा वर्ग-१ (आता गट-अ) मध्ये उप विभागस्तरावर स.अ.श्रे-१ या पदावर तर विभागस्तरावरील कार्यकारी अभियंत्याच्या पदावरील थेट भरतीच्या दृष्टीने सहायक कार्यकारी अभियंता या पदावर सरळ सेवेने अभियंत्याची नेमणूक केली जाते. अभियांत्रिकी सेवेतील अधीक्षक अभियंता, मुख्य अभियंता व सचिव आणि तत्सम अधिक जबाबदारीच्या व महत्त्वाच्या पदांवरील नेमणुकांसाठीचा स्त्रोत म्हणजे सदर सरळ सेवा प्रविष्टांचा हा संवर्ग आहे. यापैकी स.अ.श्रे-१ (सरळ सेवा उप अभियंता ) या पदावरील सेवा भरतीचे सध्याचे ३४ टक्के प्रमाण कमी करून ते २५ टक्के इतकेच ठेवण्याचे प्रस्तावित आहे. अशा परिस्थितीत अभियांत्रिकी सेवेत कार्यकारी अभियंता या तांत्रिक, प्रशासकीय आणि वित्तिय कामकाजाच्या दृष्टीने अतिशय जबाबदारीच्या उच्च पदांवर दीर्घकाळ कार्यरत राहणाऱ्या अधिकाऱ्यांच्या गुणवत्तेबाबत तडजोड करणे उचित होणार नाही. सा.बां.वि. व ज.सं.वि. ह्यांच्या मार्फत हाती घ्यावयाची विविध विकास कामे अद्यावत ज्ञान व नविन संकल्पना असणाऱ्या तरुण व हुशार अभियंत्यामार्फत पार पाडणे व त्याद्वारे प्रशासकीय कार्यक्षमता टिकविणे, वाढविणे आवश्यक आहे.

**३.२.१७** त्याचप्रमाणे ३ वर्षाची स्थापत्य अभियांत्रिकी पदविका (Diploma) प्राप्त करणाऱ्या कनिष्ठ अभियंत्याला ५ वर्षानंतर, २ वर्षाची पदविका प्राप्त करणाऱ्या कनिष्ठ अभियंत्याला ७ वर्षानंतर आणि अर्हतारहित कनिष्ठ अभियंत्याला १० वर्षानी शाखा अभियंत्याचा दर्जा दिला जातो. त्यानंतर उप अभियंता व त्यापुढे कार्यकारी अभियंता अशी पदोन्नती मिळते. तसेच उप अभियंत्याला १२ वर्षाच्या सेवेनंतर कार्यकारी अभियंता म्हणून कालबध्द पदोन्नती दिली जाते. त्यामुळे त्यांना पुरेसे सेवा विषयक लाभ दिलेले आहेत. तसेच दोन्ही विभागात थेट भरतीद्वारे कनिष्ठ अभियंता पदावर नियुक्त होणाऱ्या पदविकाधारकांना उप अभियंता व कार्यकारी अभियंता या पदावरील पदोन्नतीची संधी प्राप्त होऊ शकते. दोन्ही विभागातील सदर पदविकाधारकांची संख्या ७५३९ इतकी आहे.

**३.२.१८** वरील बाबीच्या पुष्ट्यर्थ अभियांत्रिकी सेवेच्या आलेखाबद्दलच्या तक्त्याचे **(जोडपत्र-४)** अवलोकन केल्यास, यामध्ये पदविकाधारकांच्या आलेखामध्ये अगदी शेवटी तळाला अर्हताधारक व अर्हतारहित म्हणून अनुक्रमे दिड वर्षाचा ओव्हरसियर आणि सबओव्हरसियर या अभ्यासक्रमाचा आयटीआय कोर्स ज्यांनी केला आहे ते उमेदवार व स्थापत्य अभियांत्रिकी सहायक हा एक वर्षाचा कोर्स पूर्ण केलेले उमेदवार यांचा समावेश आहे. अशा उमेदवारांचे समावेशन स्थापत्य अभियांत्रिकी सहायक म्हणून होते. सबब यांचा पदविकाधारकांच्या संख्येमध्ये समावेश करणे योग्य ठरणार नाही. कारण हा संवर्ग अतिशय निम्न साखळीतील असून त्या संवर्गातील उमेदवारांना केवळ पदोन्नतीच्या काही प्रमाणात संधी उपलब्ध करून द्याव्यात म्हणून त्यांचे स्थापत्य अभियांत्रिकी सहायक ( Civil Engineering Assistant ) या संवर्गात समावेशन केले जाते. त्यातील काहीजण पुढे जास्तीत जास्त कनिष्ठ अभियंता म्हणून पदोन्नत होतात. त्यामुळे अशा कर्मचाऱ्यांना कार्यकारी अभियंता पर्यंत पदोन्नती देणे अपेक्षित नाही.

**३.२.१९** तसेच सरळ सेवा भरतीने कनिष्ठ संवर्गामध्ये आलेले पदविकाधारक, अंशकालीन दूर शिक्षणाद्वारे अभियांत्रिकी पदविका मिळविणारे व कनिष्ठ अभियंता संवर्गात पदोन्नतीने येणारे पदविकाधारक आणि त्याचबरोबर अर्हताधारक व अर्हतारहित म्हणून दोन वर्ष किंवा दीड वर्षाचा पदविका असणारे व पुढे कनिष्ठ अभियंता संवर्गात येणारे उमेदवार यांना देखील पदविकाधारकांच्या एकंदर संख्येमध्ये मोजणे उचित ठरणार नाही. कारण हे तिन्ही प्रकारचे कनिष्ठ अभियंता, त्यांनी धारण केलेल्या पदविकेनुसार सेवेची ५ वर्ष, ७ वर्ष, १० वर्ष झाल्यावर शाखा अभियंता (Sectional Engineers Class-II ) होतात. शाखा अभियंता झाल्यानंतर संबंधित अभियंते उप विभागीय अधिकारी पदावर पदोन्नतीसाठी पात्र ठरतात. पदोन्नतीमध्ये प्रथम शाखा अभियंता व त्यानंतर उप विभागीय अधिकारी व नंतर कार्यकारी अभियंता अशी साखळी आहे. त्यामुळे ज्यांना कार्यकारी अभियंता पदावर पदोन्नतीच्या संधी उपलब्ध होतात अशाच शाखा अभियंता हयांना अभियांत्रिकी पदविकाधारकांच्या संख्येत घ्यावे लागेल. शाखा अभियंता यांची संख्या दोन्ही विभागात मिळून ७५३९ इतकी आहे. तेवढया पुरताच कार्यकारी अभियंता पदावर पदोन्नतीमधील संधीबाबत विचार होणे अपेक्षित आहे.

**३.२.२०** वरील बाब विचारात घेता कार्यकारी अभियंता पदावरील पदोन्नतीसाठी १००० पदविकाधारकांना १ पद अशी स्थिती नाही हे स्पष्ट होते. त्याचबरोबर कार्यकारी अभियंता हे दोन्ही विभागांमध्ये अत्यंत महत्त्वाचे आणि जबाबदारीचे पद आहे. तांत्रिक, प्रशासकीय, वित्तिय कामकाजाची जबाबदारी त्यांच्याकडे असते. मोठमोठे विकास प्रकल्प, नियोजन, अंमलबजावणी, व्यवस्थापन इत्यादी त्यांचे मार्फत होतात. त्यामुळे तेथे पदवीधर अभियंता, कार्यकारी अभियंता म्हणून असणे जनहिताच्या दृष्टीने व विकास प्रकल्पांची अंमलबजावणी होण्यासाठी आवश्यक आहे. त्यामुळे पदविकाधारकांचे कार्यकारी अभियंता पदावरील पदोन्नतीचे प्रमाण वाढविणे योग्य होणार नाही.

**३.२.२१** सबब कार्यकारी अभियंता पदावरील पदोन्नतीसाठीचे सहायक कार्यकारी अभियंत्यांचे ४० टक्के प्रमाण कायम ठेवावे व पदविकाधारकांसाठीचे पूर्वीप्रमाणे असलेले १० टक्के प्रमाण कायम ठेवावे.

**३.३ विषय क्रमांक १ बाबतचे समितीचे निष्कर्ष व शिफारशी**

**३.३.१ (अ) शाखास्तर :** अभियांत्रिकी पदवीधरांचे व पदविकाधारकांचे शाखा स्तरावरील (सहायक अभियंता श्रेणी-२ व कनिष्ठ अभियंता) भरतीचे प्रमाण ठरविण्याकरिता शासकीय आणि खाजगी अभियांत्रिकी महाविद्यालय/तंत्रनिकेतन मधून गेल्या तीन वर्षात उत्तीर्ण होऊन बाहेर पडलेल्या स्थापत्य पदवीधारक / पदविकाधारक यांची उच्च व तंत्र शिक्षण विभागाकडून माहिती प्राप्त करून घेण्यात आली. सदर माहितीवरून असे निदर्शनास आले की, सन २००८-०९ मध्ये २५०५ इतके पदवीधर तर ४७१७ इतके पदविकाधारक उत्तीर्ण होऊन बाहेर पडले आहेत. हे प्रमाण साधारणतः १:२ असे असले तरी पदविकाधारकांमधील बरेच उमेदवार पुढे पदवी अभ्यासक्रमासाठी किंवा एएमआयई या पदवी समकक्ष अर्हतेसाठी प्रवेश घेऊन पदवी संपादन करतात. तसेच सध्याच्या उदारीकरण, खाजगीकरण आणि जागतिकीकरणाच्या युगात (Era of Liberlization, Privatization & Globalization) रस्ते, वीज व पाणी या पायाभूत सोयी सुविधांची कामे मोठया प्रमाणात खाजगी क्षेत्राकडून केली जातात. गृहनिर्माण व इतर क्षेत्रामध्ये देखील मोठया प्रमाणात स्थापत्य इंजिनियर्सची आवश्यकता असते. त्याचबरोबर राज्य शासनाच्या ग्राम विकास विभाग, पाणीपुरवठा, नगर विकास, उद्योग इ. अनेक विभागांमध्ये आणि शासकीय / निमशासकीय महामंडळे व बोर्ड हयांना देखील मोठया प्रमाणात अभियंत्यांची आवश्यकता असते. त्यामुळे शासकीय आणि खाजगी अभियांत्रिकी व तंत्रनिकेतन महाविद्यालयामधून पदवीधर व पदविकाधारक अभियंते दरवर्षी बाहेर पडत असले तरी, सर्वच अभियंते सार्वजनिक बांधकाम विभाग व जलसंपदा विभागामध्ये येतात असे नाही.

**३.३.२** जलसंपदा विभाग आणि सार्वजनिक बांधकाम विभाग हे जनतेसाठी मुलभूत सोयीसुविधा (Infrastructural Facilities) उपलब्ध करून देणारे विभाग आहेत. विकास प्रकल्पांचे नियोजन, सर्वेक्षण, अन्वेषण, संकल्पन, प्रकल्प अहवाल तयार करणे आणि त्यानंतर प्रत्यक्ष दूरवरच्या किंवा दुर्गम क्षेत्रामध्ये विकास प्रकल्पांची अंमलबजावणी करणे इत्यादी महत्त्वाची कामे या विभागाकडून केली जातात. यामध्ये कनिष्ठ अभियंता हा एक महत्त्वाचा पायाभूत घटक आहे. त्यामुळे पायाभूत विकास कामे आवश्यक गतीने व **अधिक गुणवत्तापूर्वक** पूर्ण करण्याच्या दृष्टीने सदर पदावर अद्ययावत अभियांत्रिकी व आधुनिक उच्च तंत्रज्ञान अवगत असणाऱ्या अभियांत्रिकी पदवीधरांची मोठ्या प्रमाणावर भरती करणे गरजेचे आहे.

**३.३.३** वर नमूद केल्याप्रमाणे पदवीधर व पदविकाधारक यांचे भरतीचे प्रमाण ५०:५० असे करणे संयुक्तीक होईल व त्याअनुषंगाने ५०% पदविकाधारकांच्या प्रमाणामध्ये (५० हे १००% धरून ) ८५% पदे पदविकाधारकांच्या नेमणुकीने थेट भरतीद्वारे भरण्यात यावीत व १५% पदे पदोन्नतीने भरण्यात यावीत. त्यामध्ये स्थापत्य अभियांत्रिकी सहायक या संवर्गातून ५% पदे अंशकालीन पदविकाधारकांमधून तर उर्वरीत १०% अन्य अर्हताधारकांमधून पूर्वीप्रमाणे पदोन्नतीने भरण्यात यावीत. सदर बाब विचारात घेऊन समिती या मुद्यांबाबत पुढील प्रमाणे शिफारस करीत आहे.

**३.३.४ शिफारस**

**(१) अभियांत्रिकी पदवीधरांचे व पदविकाधारकांचे सहायक अभियंता श्रेणी-२ व कनिष्ठ अभियंता या पदावर भरतीचे सध्याचे प्रमाण २५:७५ वरून ५०:५० असे करण्यात यावे.**

(२) परिणाम स्वरूप पदविकाधारकांच्या प्रमाणामध्ये (५० हे १०० टक्के धरून) ८५ टक्के पदविकाधारकांच्या थेट भरतीद्वारे भरण्यात यावीत व १५ टक्के पदे पदोन्नतीने भरण्यात यावीत. त्यामध्ये स्थापत्य अभियांत्रिकी सहायक या संवर्गातून ५ टक्के पदे अंशकालीन पदविकाधारकांमधून तर उर्वरित १० टक्के पदे अन्य अर्हताधारकांमधून पदोन्नतीने भरण्यात यावीत.

(३) सदर सुधारित प्रमाण अंमलात आल्याच्या परिणामी स.अ.श्रेणी-२ संवर्गात सध्याच्या पदांपेक्षा जास्त पदे उपलब्ध होतील तर कनिष्ठ अभियंता (पदविकाधारक) संवर्गातील पदे कमी होतील. परिणामतः कनिष्ठ अभियंता संवर्गात सध्याच्या भरतीनुसार कार्यरत पदांचे अधिक्य असेल. सदर बाब सुधारित अभियांत्रिकी सेवा आलेखामध्ये (Engineering hierarchy) (जोडपत्र-५) दर्शविलेल्या संभाव्य सुधारित प्रमाणानुसार येणाऱ्या संवर्ग संख्येच्या स्थितीवरून स्पष्ट होईल. हे प्रमाण लागू करणेबाबत नियम लागू झाल्यानंतर कनिष्ठ अभियंता संवर्गात कार्यरत असलेल्या पदावरील अधिकारी जस जसे सेवा निवृत्त / पदोन्नत होतील त्या प्रमाणात स.अ.श्रेणी-२ मधील रिक्त आणि वाढीव पदे सरळ सेवेने भरण्यात यावीत. मात्र, शासन सेवेत गुणवत्ताधारक उमेदवार यावेत म्हणून लोकसेवा आयोगामार्फत एकदम मोठी भरती न करता ती टप्प्याटप्प्याने समप्रमाणात हा अहवाल मान्य झाल्याच्या तारखेपासून पुढील पाच वर्षांच्या कालावधीत, परंतु प्रत्येक वर्षी सा.बां.वि. व जलसंपदा विभागाने प्रत्येकी जास्तीतजास्त ४०० या प्रमाणामध्ये भरण्यात यावीत. त्यानंतर प्रत्येक वर्षी १५० पर्यंत याप्रमाणे मागणीपत्र पाठविण्यात यावीत.

(४) स.अ.श्रेणी-२ हा पदवीधर कनिष्ठ अभियंता संवर्ग, अभियांत्रिकी सेवेतील विकास प्रकल्पांचे नियोजन व अंमलबजावणी करणारा पायाभूत घटक आहे. त्याची भरतीची प्रक्रिया सुलभ ठेवून आयोगाकडून लवकर अर्हताप्राप्त उमेदवार मिळण्याची आवश्यकता आहे. म्हणून स.अ.श्रेणी-२ साठी सध्या सहायक अभियंता श्रेणी-१ व सहायक कार्यकारी अभियंता ह्यांचे बरोबर घेण्यात येणाऱ्या संयुक्त स्पर्धात्मक परिक्षेऐवजी स्वतंत्र परीक्षा घेण्यात यावी.

### ३.३.५ (ब) उप विभागस्तर

शाखास्तरावरील स.अ.श्रे-२ पदावरील सध्याचे सरळ सेवेचे प्रमाण २५ टक्यांऐवजी ५० टक्के करण्याचे प्रस्तावित आहे. तसेच अभियांत्रिकी सेवेतील गट-अ व गट-ब मध्ये अनुक्रमे विभागस्तर (स.का.अ.), उप विभागस्तर (स.अ.श्रे-१) व शाखास्तर (स.अ.श्रे-२) अशा सलग तीन स्तरावर सरळ सेवेद्वारे भरती केली जाते. सदर बाब विचारात घेता कार्यरत अभियंत्यांना सेवेअंतर्गत उन्नतीसाठी चांगली संधी देण्याच्या दृष्टीने समिती पुढीलप्रमाणे शिफारस करीत आहे.

### ३.३.६ शिफारस

(१) उप विभागस्तरावरील सरळ सेवा भरतीचे (स.अ.श्रे-१) प्रमाण ३४ टक्यांऐवजी २५ टक्के करण्यात यावे व शिल्लक ९ टक्के प्रमाण पदवीधर स.अ.श्रे-२ यांच्या उप विभागीय अभियंता पदावरील पदोन्नतीसाठी वापरावे.

(२) शाखास्तरावरील पदविकाधारकांचे भरतीचे प्रमाण ७५ टक्यावरून ५० टक्के एवढे प्रस्तावित करण्यात आल्यामुळे त्याप्रमाणात कनिष्ठ/ शाखा अभियंता यांच्या उप विभागीय स्तरावरील उप विभागीय अधिकारी पदोन्नतीचे प्रमाण ३३ टक्यावरून २५ टक्के करण्यात यावे, शिल्लक ८ टक्के प्रमाण पदवीधर स.अ.श्रे-२ यांच्या उप विभागीय अभियंता पदावरील पदोन्नतीसाठी वापरावे.

(३) शाखास्तरावर पदवीधरांचे प्रमाण (स.अ.श्रे-२) २५ टक्यांवरून ५० टक्के प्रस्तावित करण्यात येत आहे. त्यामुळे वर (१) व (२) येथे नमूद केल्याप्रमाणे उप विभागस्तरावरील सरळ सेवा भरतीचे व पदविकाधारकांचे पदोन्नतीचे अनुक्रमे ९ व ८ टक्क्यानी कमी होणारे प्रमाण पदवीधर स.अ.श्रे-२ संवर्गाच्या पदोन्नतीसाठी वापरण्यात यावे. म्हणजेच उप विभागीय अभियंता पदावरील पदोन्नतीचे सध्याचे ३३ टक्के प्रमाण ५० (३३+९+८) टक्के इतके ठेवावे.

(४) उपविभाग स्तरावरील भरतीचे / पदोन्नतीचे प्रमाण प्रस्तावित केल्याप्रमाणे सुधारण्यात यावे. परंतु त्यामुळे होणारे परिणाम विचारात घेऊन सुधारित प्रमाणानुसार निर्धारित संवर्गसंख्येप्रमाणे सहायक अभियंता श्रेणी-१ व सहायक कार्यकारी आभियंता या संवर्गातील सरळ सेवेची पदे शिफारस मान्य झाल्याच्या तारखेपासुन येत्या ३ वर्षात समप्रमाणात आयोगाकडे खास प्रयत्न करून भरण्यात यावीत.

(५) सध्या स.का.अ. या पदावरील नेमणुकीसाठीची पात्रता स्पर्धात्मक परिक्षेमध्ये उच्चतम गुण प्राप्त करणाऱ्या उमेदवारांमधून निश्चित केली जाते. अशी पात्रता निश्चित करताना सदर पदांसाठी मागविण्यात आलेले एकूण उमेदवार विचारात घेतले जातात व त्यानुसार सर्वात अधिक गुण प्राप्त करणारा प्रथम या तत्वाप्रमाणे मागविण्यात आलेल्या एकूण उमेदवारांपैकी शेवटच्या उमेदवारास प्राप्त होणारे गुण ही सदर पदावरील नियुक्ती बाबतची कटऑफ रेषा समजली जाते. महाराष्ट्र लोकसेवा आयोग त्या-त्या वेळी मागणी केलेली पदे व उमेदवारांची उपलब्धता यांचा विचार करून वर नमूद केल्याप्रमाणे कट ऑफ रेषा गुणवत्तेसाठी निश्चित करते. सदर बाब विचारात घेता सहायक कार्यकारी अभियंता या पदासाठीची किमान अर्हता ६५ टक्के अशी निश्चित करणे उचित ठरणार नाही. अशी साचेबद्ध (रिजिड) अर्हता निश्चित केल्यास उमेदवार उपलब्ध होणे अडचणीचे ठरू शकते. अशा परिस्थितीत साचेबद्धपणे किमान अर्हता ठरविणे योग्य होणार नाही.

(६) उप विभाग स्तरावर सहायक अभियंता श्रेणी-१ व उप विभागीय अभियंता व उप विभागीय अधिकारी या तीन्ही संवर्गातील अभियंते एकाच प्रकारचे कामकाज करतात त्यांची कर्तव्ये व जबाबदाऱ्या सारख्याच आहेत आणि यापूर्वी उप विभागस्तरावरील अभियंत्याला उप अभियंता असे समजले जात होते, याबाबी विचारात घेऊन उपरोक्त तीन्ही पदांचे नामाभिधान उप अभियंता असे करण्यात यावे.

**३.३.७ (क) विभागस्तर**

कनिष्ठ अभियंता / शाखा अभियंता पदावरील पदविकाधारक अभियंत्यांची संख्या पहाता यांना कार्यकारी अभियंता या पदावर पदोन्नतीच्या अधिक संधी देण्याच्या दृष्टीकोनातून स.का.अ. साठी असलेला सध्याचा ४० टक्के कोटा काही प्रमाणात कमी करून तो पदविकाधारकांच्या पदोन्नतीसाठी देण्याबाबतच्या शक्यते संदर्भात दोन्ही विभागांच्या सचिवांनी तपासणी करून त्यामध्ये बदल करण्याची आवश्यकता नसल्याबाबत दिलेल्या अभिप्रायांवर समितीच्या बैठकीमध्ये सविस्तर चर्चा झाली. चर्चेमध्ये सहायक कार्यकारी अभियंता यांच्या कार्यकारी अभियंता पदावरील पदोन्नतीसाठीचे सध्याचे ४० टक्के एवढे प्रमाण कमी करून ते २५ टक्के एवढे ठेवण्याची व त्याच प्रमाणात उप विभागीय अधिकारी (पदविकाधारक) यांच्या कार्यकारी अभियंता पदावरील पदोन्नतीचे प्रमाण वाढविण्याबाबत विचार विमर्ष झाला. सविस्तर चर्चेअंती कार्यकारी अभियंता पदावरील पदोन्नतीसाठी सहायक कार्यकारी अभियंत्यांचे ४० टक्के प्रमाण आहे, ते ५ टक्यांनी कमी करून पदविकाधारक, उप विभागीय अधिकारी यांच्या पदोन्नतीसाठी देण्यात यावे. परिणामतः सहायक कार्यकारी अभियंत्यांचे कार्यकारी अभियंता पदावरील पदोन्नतीसाठीचे प्रमाण ३५ टक्के व उप विभागीय अधिकाऱ्यांकरिता १० टक्क्यांऐवजी कार्यकारी अभियंता पदोन्नतीसाठी १५ टक्के एवढे करण्यात यावे. वरिष्ठ पदावरील गुणवत्ता आणि दर्जा व त्याचबरोबर प्रशासकीय कार्यक्षमता टिकून राहण्यासाठी उच्च तांत्रिक क्षमता असणारे अभियंते शासन सेवेत येणे आवश्यक आहे. त्यामध्ये सहायक कार्यकारी अभियंता संवर्गात कार्यकारी अभियंता पदावरील सध्याचे ४० टक्के प्रमाण ३५ टक्के पेक्षा कमी करणे योग्य होणार नाही असे समितीचे मत झाले, त्यामुळे हे प्रमाण ३५ टक्के इतके कमी करून त्यातील ५ टक्के पदवीकाधारक उप विभागीय अधिकारी यांच्या पदोन्नतीसाठी देण्यात यावे. त्यानुसार खालील शिफारशी करण्यात येत आहेत.

**३.३.८ शिफारस**

(१) सहायक कार्यकारी अभियंता पदावरून कार्यकारी अभियंता पदावरील पदोन्नतीसाठी असलेले प्रमाण ४० टक्यावरून ३५ टक्के करावे.

(२) उप विभागीय अधिकारी यांचे कार्यकारी अभियंता पदावरील पदोन्नतीचे सध्याचे १० टक्के प्रमाण १५ टक्के करावे.

# ४. विषय क्रमांक २ : एकूण पद संख्या कायम ठेवून शाखास्तरावरील व उप विभागावरील पदे लगतच्या उच्चस्तरावर दर्जोन्नत करून संवर्ग संख्या कशी असावी.

## ४.१ संघटनांचे अभिप्राय

### ४.१.१ राजपत्रित अभियंता संघटना

या मागणी संदर्भात दर्जोन्नत करावयाच्या जलसंपदा विभाग व सार्वजनिक बांधकाम विभागातील पदांचा तपशील संघटनेने सादर केला आहे.कृपया तो **(जोडपत्र-२)** मध्ये पहावा. त्यानुसार जलसंपदा विभाग व सार्वजनिक बांधकाम विभागातील स.अ. श्रेणी-२ / शाखा अभियंता संवर्गातील अनुक्रमे ७४० व ३०९ पदे कमी करून, ती उप अभियंता संवर्गात, उपविभागीय अभियंता संवर्गातील अनुक्रमे २४० व १९२ पदे कमी करून ती कार्यकारी अभियंता संवर्गात व कार्यकारी अभियंता संवर्गातील अनुक्रमे २३ व २० पदे कमी करून ती अधीक्षक अभियंता संवर्गात दर्जोन्नत करावी असा प्रस्ताव आहे :-

### ४.१.२ कनिष्ठ अभियंता संघटना

अशाप्रकारे निर्माण केलेली पदे सेवा नियमातील कोट्याप्रमाणे वाटप करून दिली जाणार असतील तर त्याबाबत संघटना सहमत असेल असे संघटनेतर्फे सांगण्यात आले.

### ४.१.३ महाराष्ट्र राज्य स्थापत्य अभियांत्रिकी सहायक कर्मचारी संघटना

अभिप्राय नाहीत.

### ४.१.४ महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा (वर्ग-१) संघटना

अभिप्राय नाहीत.

### ४.१.५ सरळसेवा वर्ग २ अभियांत्रिकी अधिकारी संघटना

संघटनेची हरकत नाही. मात्र अशी पदे त्या स्तरावरील सर्व संवर्गाना खुली असावीत व प्रचलित नियमांनुसारच भरावीत.

### ४.१.६ महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा संघटना

दर्जोन्नतीमुळे सर्व स्तरावरील पदांमध्ये वाढ होणार असल्या कारणाने व कोणताही आर्थिक बोजा शासनावर वाढत नसल्याने सदर प्रस्तावास या संघटनेची सहमती आहे.

## ४.२ विभागाचे अभिप्राय

"कनिष्ठ स्तरावरील पदांचे लगतच्या पदावर उन्नयन करून त्या पदांची संख्या वाढविण्याची कार्यवाही गृह व कृषि विभागात या अगोदर अंमलात आणलेली आहे. या निर्णयाच्या आधारे अभियांत्रिकी सेवेतील सहायक अभियंता श्रेणी-२ / शाखा अभियंत्याची पदे उप अभियंता, उप अभियंत्यांची पदे कार्यकारी अभियंता आणि कार्यकारी अभियंत्यांची काही पदे अधीक्षक अभियंता पदांमध्ये उन्नयन करण्याची संघटनेने विनंती केली आहे. या अनुषंगाने सविस्तर चर्चा होऊन संघटनेच्या मागणीनुसार मंडळ कार्यालयातील उप अभियंता पदे कार्यकारी अभियंता पदामध्ये व मुख्य अभियंता कार्यालयातील कार्यकारी अभियंता पदे अधीक्षक अभियंता पदांमध्ये उन्नयनीकरण करण्याबाबतच्या विनंतीचा विचार करण्यात आला. परंतु, उच्च पदावरील पदांचा दर्जा योग्य रितीने राखण्याच्या दृष्टीने या कार्यालयातील पदांचे अनावश्यकपणे उन्नयनीकरण करणे उचित ठरणार नाही. मात्र अभियांत्रिकी सेवेतील पदोन्नती मधील कुंठीतता काही अंशी दूर करण्यासाठी आणि आवश्यक त्या कार्यालयात सध्यापेक्षा उच्चस्तरावरील पदे राहण्यासाठी व प्रशासकीय कामांना गती देण्यासाठी सद्य:स्थितीत प्रादेशिक कार्यालय, मंडळ कार्यालय व विभागीय कार्यालयातील आणि महत्त्वाच्या संस्थांमधील फक्त शाखा अभियंत्याच्या काही पदांचे उन्नयन करण्यात यावे.

जोडपत्र-२ मधील जलसंपदा विभागांतर्गत पदांच्या बाबतीत प्रादेशिक कार्यालयातील १ पद, मंडळ कार्यालयातील ३ पैकी २ पदे आणि विभागीय कार्यालयातील ४ पैकी १ पद अशी ३७० पदे मिळून एकूण ५०२ पदांचे उन्नयन करण्यात यावे तसेच सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत प्रादेशिक कार्यालयातील १ पद व मंडळ कार्यालयातील ३ पैकी २ पदे आणि विभागीय कार्यालयातील ४ पैकी १ अशा एकूण १९९ पदांचे उप अभियंता संवर्गात उन्नयन करण्यात यावे. मात्र सदरहू बाब समितीसमोर विचारार्थ ठेऊन समितीच्या मान्यतेनंतर वित्त विभाग व सा.प्र.वि. च्या सहमतीनंतर अंतिम निर्णय घेण्यात यावा".

**४.३ विषय क्रमांक-२ बाबत समितीचे निष्कर्ष व शिफारशी**

या विषयाबाबत दोन्ही विभागाच्या सचिवांनी सादर केलेल्या अभिप्रायांच्या अनुषंगाने बैठकीमध्ये सविस्तर चर्चा झाली. विभागीय कार्यालये, मंडळ कार्यालये, प्रादेशिक कार्यालयामध्ये निरनिराळ्या विकास योजनांचे नियोजन, अंदाजपत्रक, नकाशे यांना मान्यता देऊन विकास कामांच्या अंमलबजावणीचे प्रस्ताव तयार करण्याचे महत्त्वपूर्ण काम केले जाते. त्यामुळे अशा प्रस्तावांची छाननी या कार्यालयामध्ये शा. अ. यांच्या ऐवजी उप अभियंता या वरिष्ठ स्तरावरील अधिकाऱ्यांकडून होणे आवश्यक आहे. विकास कामांचे नियोजन आणि अंमलबजावणी अशा कार्यपद्धतीमुळे अधिक अचूक व दर्जेदार होण्यास मदत होऊ शकेल. या निष्कर्षाप्रत समिती आली. यास्तव जलसंपदा विभागांतर्गत पदांच्या बाबतीत प्रादेशिक कार्यालयातील १ पद, मंडळ कार्यालयातील ३ पैकी २ पदे आणि विभागीय कार्यालयातील ४ पैकी १ पद अशी ३७० पदे मिळून एकूण ५०२ पदांचे उन्नयन करण्यात यावे तसेच सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत प्रादेशिक कार्यालयातील १ पद व मंडळ कार्यालयातील ३ पैकी २ पदे आणि विभागीय कार्यालयातील ४ पैकी १ अशा एकूण १९९ पदांचे उप अभियंता संवर्गात उन्नयन करण्यात यावे. मात्र संघटनेच्या मागणीनुसार मंडळ कार्यालयातील उप अभियंता पदे कार्यकारी अभियंता पदामध्ये व मुख्य अभियंता कार्यालयातील कार्यकारी अभियंता पदे अधीक्षक पदांमध्ये उन्नयनीकरण करण्याबाबतच्या विनंतीचा विचार करता, उच्च पदावरील पदांचा दर्जा योग्य रितीने राखण्याच्या दृष्टीने या कार्यालयातील पदांचे अनावश्यकपणे उन्नयनीकरण करणे उचित ठरणार नाही. त्यामुळे हा प्रस्ताव विचारात घेण्यात आला नाही. वरील बाबी विचारात घेऊन समिती पुढीलप्रमाणे शिफारस करीत आहे.

**४.३.१ शिफारस**

**जलसंपदा विभागांतर्गत येणाऱ्या प्रादेशिक कार्यालयातील १ पद, मंडळ कार्यालयातील ३ पैकी २ पदे आणि विभागीय कार्यालयातील ४ पैकी १ अशा सहायक अभियंता श्रेणी-२ / शाखा अभियंता यांच्या एकूण ५०२ पदांचे तसेच सार्वजनिक बांधकाम विभागाचे प्रादेशिक कार्यालयील १ पद, मंडळ कार्यालयातील ३ पैकी २ पदे आणि विभागीय कार्यालयातील ४ पैकी १ अशा एकूण १९९ पदांचे उप अभियंता संवर्गात उन्नयन करण्यात यावे. परिणामतः कनिष्ठ अभियंता / शाखा अभियंता / सअश्रे-२ या एकत्रित संवर्गातील जलसंपदा विभागातील ५०२ पदे व सार्वजनिक बांधकाम विभागातील १९९ पदे अशा एकूण ७०१ पदांचे उपविभाग स्तरावर उन्नयन करावे.**

**५. विषय क्रमांक ३ : सर्वसाधारण धोरणानुसार उप विभागस्तरावर पदोन्नत व सरळ सेवा प्रविष्टांचा एकच संवर्ग करावा किंवा कसे.**

**५.१ संघटनांचे अभिप्राय**

**५.१.१ राजपत्रित अभियंता संघटना**

सर्वसाधारण धोरणानुसार उपविभागीय स्तरावर पदोन्नत व सरळसेवा प्रविष्टांचा एकच संवर्ग करावा. समान ज्येष्ठता यादीसाठी शासनाने सामोपचाराने मार्ग काढावा.

**५.१.२ कनिष्ठ अभियंता संघटना**

संघटनेला हा विषय मान्य नसल्याचे स्पष्ट करण्यात आले.

**५.१.३ महाराष्ट्र राज्य स्थापत्य अभियांत्रिकी सहायक कर्मचारी संघटना**

अभिप्राय नाहीत.

**५.१.४ महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा (वर्ग-१) संघटना**

अभिप्राय नाहीत.

**५.१.५ सरळसेवा वर्ग २ अभियांत्रिकी अधिकारी संघटना**

अभिप्राय नाहीत.

**५.१.६ महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा संघटना**

गुणवत्तेवर आधारीत संवर्ग (Meritorious Ground) असल्याकारणाने संवर्ग एकत्र करू नये.

**५.२. विभागाचे अभिप्राय**

दि. ३०.९.२००९ रोजी समितीच्या बैठकीमध्ये उपरोक्त मुद्यांच्या अनुषंगाने सविस्तर चर्चा होऊन उप विभागस्तरावर पदोन्नती व सरळ सेवा प्रविष्टांच्या म्हणजेच सहायक अभियंता श्रेणी-१ आणि उप विभागीय अभियंता यांच्या ज्येष्ठता सूची एकत्रित करून त्या अनुषंगाने पुढील कार्यवाही करताना पदोन्नत उप अभियंता व सरळ सेवा सहायक अभियंता श्रेणी-१ यांची त्या त्या वर्षातील आपापसातील ज्येष्ठता ठरविताना काय कार्यपद्धती अवलंबावी, तसेच सध्याचे ज्येष्ठतेचे सर्वसाधारण नियम, १९८२ अणि त्या अनुषंगाने इतर संवर्गात सरळ सेवा आणि पदोन्नत अधिकारी यांची ज्येष्ठतासूची एकत्रित करताना कशी कार्यवाही केली जाते या बाबतची माहिती सादर करण्याचे अध्यक्षांनी सूचित केले होते. त्या अनुषंगाने केलेल्या तपासणीअंती विभागाचे अभिप्राय पुढीलप्रमाणे आहेत.

**५.२.१** या संदर्भात महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियमन) नियमावली, १९८२ च्या नियम ४ (२) नुसार कार्यवाही केली जाते. सदर नियम खालीलप्रमाणे आहे :—

(२) पोट नियम (१) मध्ये काही अंतर्भूत असले तरी –

(अ) कोणत्याही पदावरील संवर्गातील किंवा सेवेतील नेमणुकीसाठी एकाच तुकडीत निवड होऊन थेट भरती झालेल्या व्यक्तीनी नेमणूक आदेश निघाल्याच्या तारखेपासून तीस दिवसांच्या आत किंवा सक्षम प्राधिकारी स्वविवेकानुसार वाढवून देईल अशा कालावधीत जर नेमणुकीचा स्वीकार केला असेल तर त्यांच्या आपसातील ज्येष्ठता आयोगाने वा निवड मंडळाने किंवा प्रकरणपरत्वे सक्षम प्राधिका-याकडून नामनिर्देशनाद्वारे झालेल्या थेट भरतीच्या बाबतीत सदर सक्षम प्राधिका-याने लावलेल्या पसंतीक्रमानुसार निर्धारित केली जाईल.

(ब) निवड सूचीतून पदोन्नती मिळालेल्या शासकीय कर्मचा-यांच्या बाबतीत अशा निवडसूचीत त्यांची नावे ज्या क्रमाने असतील त्याच क्रमानुसार त्यांची आपसातील ज्येष्ठता राहील, जर निवडसूची दोन भागात तयार केलेली असेल तर, पहिल्या भागात बिनशर्त निवड झालेल्यांची नावे अंतर्भूत असतील व दुस-या भागात निवड झालेल्यांची नावे असतील. पहिल्या भागात समाविष्ट झालेल्या सर्व व्यक्तींचा क्रम दुस-या भागातील समाविष्ट केलेल्या व्यक्तींच्यावर लागेल.

परंतु निवड सूचीतील नावे ज्या क्रमाने लावलेली आहेत तो क्रम मागाहून आढावा घेतल्यामुळे बदलण्यात आला तर, संबंधित शासकीय कर्मचा-यांचा ज्येष्ठताक्रम त्यांच्या या सुधारित क्रमानुसार फेरमांडणी करण्यात येऊन निर्धारित केला जाईल.

(क) बदली झालेला शासकीय कर्मचारी ज्या पदावर,संवर्गात किंवा सेवेत तो बदली झालेला आहे त्या पदावरील, संवर्गातील किंवा सेवेतील अन्य शासकीय कर्मचा-यांच्या तुलनेने त्याची ज्येष्ठता, तो जेथे बदली झाला त्या पदाचा, संवर्गाचा किंवा सेवेचा वर्ग आणि वेतनमान, तेथील त्याचा सेवाकाळ आणि त्याच्या बदलीस कारणीभूत झालेली परिस्थिती यथायोग्यपणे लक्षात घेऊन सक्षम प्राधिकारी निर्धारित करील.

जेथे कोणत्याही दोन किंवा अधिक व्यक्तींच्या नावे एखादे पद, संवर्ग किंवा सेवा यातील नेमणूकीच्या तारखा आवश्यक तर, मानीव तारीख नेमून दिल्यानंतर निर्धारित केलेल्या तारखा एकच असतील तर, वयाने ज्येष्ठ असलेली व्यक्ती ज्येष्ठताक्रम निर्धारित करण्याच्या प्रयोजनार्थ ज्येष्ठ म्हणून मानली जाईल.

५.२.२ उपरोक्त तत्वानुसार कोणतेही पद, संवर्ग किंवा सेवा या मधील शासकीय कर्मचाऱ्याची ज्येष्ठता सामान्यपणे त्यांच्या त्या पदावरील संवर्गातील किंवा सेवेतील अंखडीत सेवा कालावरून निश्चित करण्यात येते. या तत्वानुसार सरळ सेवा प्रविष्टांची ज्येष्ठता त्यांच्या महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या गुणानुक्रमाने दर्शविली जाते. तसेच पदोन्नत अधिकाऱ्यांच्या बाबतीत त्यांची ज्येष्ठता त्यांच्या निवडसूचीतील स्थानावरून नियमित पदोन्नतीच्या दिनांकानुसार निश्चित केली जाते. या सरळ आणि पदोन्नत अधिकाऱ्यांची ज्येष्ठता ठरविताना सरळ सेवा प्रविष्टांच्या ज्येष्ठतेसाठी, त्यांच्या नियुक्तीचा दिनांक व पदोन्नत अधिकाऱ्यांच्या बाबतीत त्यांच्या नियमित पदोन्नतीचा दिनांक विचारात घेतला जातो, व त्या त्या दिनांकानुसार त्यांची आपापसातील ज्येष्ठता निश्चित करण्यात येते.

५.२.३ शासकीय सेवकांची विविध संवर्गातील ज्येष्ठता उपरोक्त तत्वानुसार, त्याचबरोबर त्या त्या संवर्गातील ज्येष्ठता निश्चिती बाबत जर काही विशिष्ट आदेश असतील तर तेही विचारात घेऊन निश्चित करण्यात येते. ज्येष्ठतेचे विनियमन १९८२ मधील सर्वसाधारण तत्वानुसार मंत्रालयीन विभागातील सरळ सेवाप्रविष्ट सहायक, मर्यादित विभागीय परिक्षा उत्तीर्ण सहायक व पदोन्नत सहायक यांची एकत्रितरित्या ज्येष्ठता यादी तयार केली जाते. तसेच सरळ सेवेने नियुक्त होणारे व सहायक पदावरून पदोन्नत होणारे कक्ष अधिकारी यांचीही ज्येष्ठता एकत्रितरित्या तयार केली जाते. महसूल व वन विभागामध्ये उप जिल्हा अधिकारी पदावर सरळ सेवेने नियुक्त व पदोन्नत होणाऱ्या अधिकाऱ्यांची ज्येष्ठता यादी एकत्रित स्वरूपातच ठेवण्यात येते. सदर यादी त्या पदाच्या ज्येष्ठता निश्चिती संदर्भातील १९७७ च्या नियमाप्रमाणे केली जाते. तसेच अभियांत्रिकी सेवेतील कार्यकारी अभियंता या संवर्गातील अधिकाऱ्यांची ज्येष्ठतासूची एकत्रित स्वरूपात जलसंपदा विभागाने प्रसिद्ध केलेल्या १९८३ च्या ज्येष्ठतेबाबतच्या नियमाप्रमाणे निश्चित केली जाते. म्हणजेच १९७७ च्या व १९८३ च्या नियमानुसार संबधित संवर्गातील अधिकाऱ्यांची एकत्रित ज्येष्ठता यादी ठेवण्याचे काम अनुक्रमे महसूल विभाग व जलसंपदा विभाग आणि सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्या कडून केली जाते. सदर कार्यवाही सा.प्र.वि. ने प्रसिद्ध केलेल्या १९८२ च्या ज्येष्ठतेच्या सर्वसाधारण नियमांशी सुसंगत अशी आहे. तसेच सरळ सेवेने स.अ.श्रे-१ या पदावर नेमणूक होणाऱ्या व पदोन्नतीने उप विभागीय अभियंता या पदावर नेमणूक होणाऱ्या अधिकाऱ्यांची एकत्रित ज्येष्ठता यादी, सध्याचे १९७० चे नियम सुधारित केल्यावर त्या दिनांकापासुन ठेवण्यात येणार आहे. त्यामुळे सध्या अस्तित्वात असलेल्या प्रत्येक पदाच्या स्वतंत्र ज्येष्ठता याद्यांवर त्याचा काही विपरीत परिणाम होणार नाही. तथापि, कार्यकारी अभियंता, स.अ.श्रे-१ व उप विभागीय अभियंता यांच्या ज्येष्ठतेबाबतचे नियमन जलसंपदा विभागाच्या दि. ७ एप्रिल, १९८३ च्या ज्येष्ठता विषयक नियमाप्रमाणे केले जाते. सदर नियम घटनेच्या कलम ३०९ मधील तरतुदीनुसार अधिसूचित केले आहेत. त्यामुळे अशाप्रकारे ज्येष्ठतासूची एकत्रित करावयाची झाल्यास दि. ७ एप्रिल १९८३ च्या नियमांमध्ये सुधारणा करणे आवश्यक राहील. सबब उप विभागस्तरावर स.अ.श्रे-१ (सरळसेवा) व उप विभागीय अभियंता (पदोन्नती) या पदवीधर अभियंत्याची ज्येष्ठता यादी एकत्रित स्वरूपात तयार करण्यास हरकत नसावी."

### ५.३ विषय क्रमांक-३ बाबत समितीचे निष्कर्ष व शिफारशी

शासकीय सेवकांची विविध संवर्गातील ज्येष्ठता, महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियमन) नियमावली, १९८२ च्या नियमातील सर्वसाधारण तत्वा नुसार त्याचबरोबर त्या-त्या संवर्गातील ज्येष्ठता निश्चितीबाबत जर काही विशिष्ट नियम असतील तर तेही विचारात घेऊन निश्चित करण्यात येते. ज्येष्ठतेचे विनियमन १९८२ मधील सर्वसाधारण तत्वानुसार मंत्रालयीन विभागातील सरळ सेवा प्रविष्ट सहायक, मर्यादित विभागीय परीक्षा उत्तीर्ण सहायक व पदोन्नत सहायक यांची एकत्रितरित्या ज्येष्ठता यादी तयार केली जाते. तसेच सरळ सेवेने नियुक्त होणारे कक्ष अधिकारी व सहायक पदावरून पदोन्नत होणारे कक्ष अधिकारी यांचीही ज्येष्ठता एकत्रितरित्या तयार केली जाते. महसूल व वन विभागामध्ये उपजिल्हाधिकारी

पदावर सरळ सेवेने नियुक्त व पदोन्नत होणाऱ्या अधिकाऱ्यांची ज्येष्ठता यादी सुद्धा त्या पदाच्या ज्येष्ठता निश्चिती संदर्भातील १९७७ च्या नियमाप्रमाणे केली जाते. सध्या जलसंपदा विभागातील अभियांत्रिकी सेवेतील अधिकाऱ्यांची ज्येष्ठता १९८३ च्या ज्येष्ठतेबाबतच्या नियमाप्रमाणे निश्चित केली जाते. या बाबी विचारात घेता समिती पुढीलप्रमाणे शिफारस करीत आहे.

५.३ १ शिफारस

**अभियांत्रिकी सेवेतील सहायक अभियंता श्रेणी-१ व उप विभागीय अभियंता या पदवीधर अभियंत्यांची सुध्दा सामायिक ज्येष्ठता यादी ठेवण्यात यावी. त्यासाठी जलसंपदा विभागाने प्रसिद्ध केलेल्या ज्येष्ठतेबाबतच्या दि. ७ एप्रिल १९८३ च्या नियमांमध्ये आवश्यक ती सुधारणा अहवाल मान्य झाल्यापासून तीन महिन्यात करण्यात यावी. सदर सुधारणा प्रॉस्पेक्टिव्ह असतील. म्हणजेच सदर सुधारित ज्येष्ठतेचे नियम त्याबाबतची अधिसूचना प्रसिद्ध झाल्याच्या दिनांकापासून अंमलात येतील.**

६. समितीच्या विचारार्थ आलेले अन्य अनुषंगिक विषय

**वरील विषया व्यतिरिक्त मात्र त्याच विषयाच्या अनुषंगाने समितीसमोर अभियांत्रिकी सेवा नियमांच्या पुनर्रचनेबाबत तपासणी करताना खालील अनुषंगिक दोन विषय देखील विचारार्थ आले. सदर विषय अभियांत्रिकी सेवा विषयक उपरोक्त विषयांशी संबंधित असल्यामुळे त्या संदर्भात देखील समितीने अभ्यासपूर्वक शिफारशी करण्याचे ठरविले. सदर विषय व त्याबाबतचे विभागाचे अभिप्राय व त्यावरील समितीचे निष्कर्ष व शिफारशी पुढीलप्रमाणे आहेत. :-**

**७. विषय क्रमांक ४ : सेवेमध्ये असलेल्या अभियंत्यांना अभियांत्रिकी सेवा वर्ग-१ व वर्ग-२ करिता सरळ सेवेने लोकसेवा आयोगाच्या स्पर्धा परीक्षेमार्फत होणाऱ्या नेमणुकीसाठी परीक्षेस बसण्यास वयाची अट पूर्ण पणे शिथिल करणे.**

७.१ विभागाचे अभिप्राय :

विविध संघटनाकडून प्राप्त झालेल्या इतर मुद्यांच्या अनुषंगाने तपासणी करताना उपरोक्त मुद्याबाबत सचिवांच्या बैठकीमध्ये सविस्तर चर्चा झाली. त्यामध्ये सेवेमध्ये असणा-या अभियंत्यांना, अभियांत्रिकी स्पर्धात्मक परीक्षेला बसण्यासाठी संधी मिळावी व त्यांच्या ज्ञानाचा व अनुभवाचा अधिक चांगला फायदा दोन्ही विभागांना व्हावा म्हणून स.अ.श्रे-१ तसेच स.का.अ. पदावरील थेट भरतीने नियुक्तीसाठी अर्ज करण्याकरिता वयाची अट शिथिल करण्याच्या दृष्टीकोनातून सेवेत कार्यरत असलेल्या अभियंत्यांना महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत वरिष्ठ पदावरील सरळसेवेने भरण्यात येणाऱ्या पदांकरिता स्पर्धात्मक परीक्षेला बसण्यासाठी ५ वर्षांची सूट देण्यात यावी. म्हणजेच खुल्या प्रवर्गातील अभियंत्याला ३८ व मागासवर्गीयाना ४३ वयापर्यंत परीक्षेला बसण्यास परवानगी देण्याचे प्रस्तावित करण्यात येत आहे.

७.२ विषय क्रमांक-४ बाबत समितीचे निष्कर्ष व शिफारशी

सेवेमध्ये असणा-या अभियंत्यांना अभियांत्रिकी स्पर्धात्मक परीक्षेला बसण्यासाठी संधी मिळावी व त्यांच्या ज्ञानाचा व अनुभवाचा अधिक चांगला फायदा दोन्ही विभागांना व्हावा म्हणून स.अ.श्रे-१ तसेच स.का.अ. पदावरील थेट भरतीने नियुक्तीसाठी अर्ज करण्याकरीता वयाची अट शिथिल करण्याच्या दृष्टीकोनातून सेवेत कार्यरत असलेल्या अभियंत्याना म.लो.आ. मार्फत वरीष्ठ पदावरील सरळ सेवेने भरण्यात येणाऱ्या पदाकरीता स्पर्धात्मक परीक्षेला बसण्यासाठी ५ वर्षाची सूट देण्याबाबत सचिवांनी सादर केलल्या अभिप्रायांबाबत बैठकीमध्ये चर्चा होऊन समितीने पुढील प्रमाणे शिफारस केली.

७.३ शिफारस

**सेवेत कार्यरत असलेल्या अभियंत्यांना म.लो.आ. मार्फत वरिष्ठ पदावरील सरळसेवेने भरण्यात येणाऱ्या पदांकरिता स्पर्धात्मक परीक्षेला बसण्यासाठी ५ वर्षांची सूट देण्यात यावी. म्हणजेच खुल्या प्रवर्गातील अभियंत्याला ३८ व मागासवर्गीयाला ४३ वयापर्यंत परीक्षेला बसण्यास सूट देण्यात यावी.**

**८. विषय क्रमांक ५ : सेवेतील ए.एम.आय.ई. धारकांसाठी ३/८ सेवेचा लाभ पुढे सुरू ठेवणे आणि त्याच बरोबर त्यांचेकरिता स्वतंत्र संवर्ग निर्माण करणे व त्यांना उप विभागीय अभियंता तसेच कार्यकारी अभियंता या पदावर पदोन्नतीसाठी स्वतंत्र कोटा ठेवणे.**

**८.१ विभागाचे अभिप्राय**

शासनसेवेतील पदविकाधारक कनिष्ठ अभियंत्यांनी ए.एम.आय.ई. परीक्षा उत्तीर्ण केल्यानंतर त्यांना ३/८ सेवेचा लाभ देऊन स.अ.श्रे-२ या पदवीधरांच्या संवर्गात शासन निर्णय दि. २९.११.१९८४ मधील तरतुदी अन्वये समाविष्ट केले जात होते. परंतु, स.अ.श्रे-२ वर्गाचे सेवाप्रवेश नियम दि. १६.६.१९९७ रोजी प्रसिद्ध झाल्यानंतर सदर लाभ देणे बंद झाले.

सेवेतील पदविकाधारकांनी उच्च तांत्रिक व शैक्षणिक अर्हता प्राप्त केल्यास त्याचा विकास कामे अधिक चांगल्या पध्दतीने राबविण्यासाठी उपयोग होणार असल्याने हा लाभ पुन्हा सुरु करावा व तशी तरतूद नियमात करण्यास हरकत नसावी, मात्र स.अ.श्रेणी-२ हा पदविधरांचा संवर्ग आहे. व ए.एम.आय.ई. अर्हता धारक हे देखील पदवीधर अभियंते आहेत. त्यामुळे ए.एम.आय.ई. अर्हता धारकांचा स्वतंत्र संवर्ग निर्माण करता येणार नाही. तसेच पदवीधर स.अ.श्रेणी-२ या सवंर्गासाठी, पदोन्नतीकरिता स्वतंत्र प्रमाण ठेवलेले आहे. सबब, ए.एम.आय.ई धारकांना त्याच्या करीता पदोन्नतीसाठी स्वतंत्र प्रमाण ठेवण्याचा प्रश्न येत नाही.

**८.२ विषय क्रमांक ५ बाबत समितीचे निष्कर्ष व शिफारशी**

शासन सेवेतील पदविकाधारकांनी स्थापत्य अभियांत्रिकीतील पदविसमकक्ष शैक्षणिक अर्हता प्राप्त केलेल्या अभियंत्यांना स.अ.श्रे-२ या पदविधरांच्या संवर्गात ३/८ सेवेचा लाभ दि.२९.११.१९८४ च्या शासन निर्णयाच्या तरतुदीप्रमाणे देण्यात येतो. तथापि दि.१६.६.१९९७ रोजी सहायक अभियंता श्रेणी-२ संवर्गाचे सेवाप्रवेश नियम तयार करण्यात आले. त्यामुळे दि.१६.६.१९९७ पासून ही कार्यवाही बंद करण्यात आली होती. शासन सेवेतील पदवीकाधारकांनी स्थापत्यें अभियांत्रिकीतील पदवी समकक्ष उच्च तांत्रिक शैक्षणिक अर्हता प्राप्त केल्यास त्यांचा विकास कामे अधिक चांगल्या पध्दतीने राबविण्यासाठी उपयोग होणार असल्याने त्यांना सअश्रे-२ या पदवीधरांच्या संवर्गात ३/८ सेवेचा लाभ देऊन ज्येष्ठता देण्याबाबतची सवलत दि.१६.६.१९९७ पासून पुढे सुरु ठेवण्यात यावी. तशी तरतूद नियमात यथावकाश करण्यात यावी. सदर तरतूद ठेवताना ३/८ सेवेच्या लाभामुळे समावेशनाने करावयाच्या स.अ.श्रेणी-२ संवर्गाची एकूण संवर्गसंख्या कोणत्याही परिस्थितीत ओलांडली जाणार नाही याचा विचार करावा व काळजीपूर्वक ही तरतूद करावी.

मात्र स.अ.श्रेणी-२ हा पदवीधरांचा संवर्ग आहे. व ए.एम.आय.ई. अर्हता धारक हे देखील पदवीधर अभियंते आहेत. त्यामुळे ए.एम.आय.ई. अर्हता धारकांचा स्वतंत्र संवर्ग निर्माण करता येणार नाही. तसेच पदवीधर स.अ.श्रेणी-२ या सवंर्गासाठी पदोन्नतीकरिता स्वतंत्र प्रमाण ठेवले आहे. सबब, ए.एम.आय.ई धारकांना त्यांच्याकरिता पदोन्नतीसाठी स्वतंत्र प्रमाण ठेवण्याचा प्रश्न येत नाही.

**८.३ शिफारस**

**शासन सेवेतील पदविकाधारकांनी स्थापत्य अभियांत्रिकीतील पदवीसमकक्ष शैक्षणिक अर्हता प्राप्त केलेल्या अभियंत्यांना स.अ.श्रे-२ या पदवीधरांच्या संवर्गात ३/८ सेवेचा लाभ देऊन ज्येष्ठता देण्याबाबतची सवलत दि.१६.६.१९९७ पासून पुढे सुरू ठेवण्यात यावी. मात्र ए.एम.आय.ई धारकांकरिता पदोन्नतीसाठी स्वतंत्र प्रमाण ठेवता येणार नाही.**

---

## ऋण निर्देश

अभियांत्रिकी सेवेतील विविध संघटनांनी महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा नियमांच्या पुनर्रचनेसंदर्भात समितीस निवेदने सादर करून चर्चेत उपयुक्त माहिती उपलब्ध करून दिली, त्यांनी दिलेल्या सहकार्याबद्दल समिती त्यांचे आभार मानते.

तसेच महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवानियमांच्या पुनर्रचनेसंदर्भात आपला अहवाल सादर करण्यासाठी समितीला आवश्यक असलेले कागदपत्र व माहिती प्रशासकीय विभाग म्हणून जलसंपदा विभाग व सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्याकडून वेळोवेळी पुरविण्यात आली. विशेषतः समिती समोरील विषयांच्या अनुषंगाने आवश्यक ती माहिती, आकडेवारी, तपशीलासह एकत्रित करून समितीला उपलब्ध करून देण्यामध्ये जलसंपदा विभागातील आ.(संनि) कार्यासनाकडून बहुमूल्य सहकार्य लाभले त्यामुळे समितीचे कामकाज गतीने पूर्णत्वास नेणे सुलभ झाले. त्यामुळे समिती या दोन्ही विभागातील संबंधित अधिकारी /कर्मचा-यांचे आभार मानते.

या कामकाजासाठी जलसंपदा विभागातील श्री. द. ल. थोरात, तत्कालीन सह सचिव (सेवा), श्रीमती ज्योती पोतदार, सह सचिव, श्री. कि. रा. कुलकर्णी, अवर सचिव, श्री. धा. र. चिंदरकर, कक्ष अधिकारी व त्यांचे सहकारी, सार्वजनिक बांधकाम विभागातील श्री. बी. डी. देशमुख, उप सचिव तसेच श्री. श्री. प्र. पाटील सह सचिव, सा. प्र. वि. यांचे बहुमूल्य सहकार्य लाभलेले आहे. त्याबद्दल समिती त्यांचे आभार मानते.

**के. पी. बक्षी,**
अध्यक्ष,
प्रधान सचिव (सेवा) सामान्य प्रशासन विभाग.

**एकनाथ पाटील,**
सदस्य,
सचिव (जलसंपदा),ज.सं.वि.

**मुरलीधर मुंढे,**
सदस्य,
सचिव (लाक्षेवि),ज.सं.वि.

**धनंजय धवड,**
सदस्य,
सचिव (रस्ते), सा.बां.वि.

**गं. म. कंधारे,**
सदस्य,
सचिव (बांधकाम), सा.बां.वि.

**आ. बा. पाटील,**
सदस्य सचिव.
सह सचिव (सेवा), जलसंपदा विभाग.

**जोडपत्र १**

**राजपत्रित अभियंता संघटना, महाराष्ट्र यांच्या प्रलंबित मागण्यांसंदर्भात समिती गठित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्र.संकीर्ण १००६/(५६/२००६)-आ.(सं.नि.),
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
दिनांक : ११ जुलै, २००६

**प्रस्तावना :**

राजपत्रित अभियंता संघटना, महाराष्ट्र या संघटनेने शासनास सादर केलेल्या निवेदनातील मागण्यांच्या अनुषंगाने मा.मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली दि. ०९.०५.२००६ रोजी बैठक आयोजित करण्यात आली होती. या बैठकीस मा.मंत्री (सार्वजनिक बांधकाम) आणि मा.मुख्य सचिव व इतर सर्व संबंधित अधिकारी उपस्थित होते. राजपत्रित अभियंता संघटनेच्या मागण्यांसंदर्भात मा.अपर मुख्य सचिव (सेवा) ह्यांचे अध्यक्षतेखाली समिती गठित करून त्यांच्या मागण्यांचा सर्वसमावेशक विचार करून निर्णय घेण्यात यावा असे बैठकीत ठरले.

**शासन निर्णय :**

उपरोक्त निर्णयाच्या अनुषंगाने राजपत्रित अभियंता संघटना, महाराष्ट्र यांच्या खाली नमूद केलेल्या मागण्यांवर निर्णय घेण्यासाठी मा.अपर मुख्य सचिव (सेवा) हयांचे अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.

**समिती**

| | | |
|---|---|---|
| मा. अपर मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग | : | अध्यक्ष |
| प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग | : | सदस्य |
| सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग | : | सदस्य |
| सचिव (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग | : | सदस्य |
| सचिव (रस्ते), सार्वजनिक बांधकाम विभाग | : | सदस्य |
| सह सचिव (सेवा), जलसंपदा विभाग | : | सदस्य सचिव |

**कार्यकक्षा :**

(१) अभियांत्रिकी पदवीधरांची विपुलता विचारात घेऊन शाखा स्तर व उपविभाग/विभागस्तरावरील पदवीधरांचे भरती व पदोन्नतीचे प्रमाण कसे असावे.

(२) एकूण पदसंख्या कायम ठेवून, शाखास्तरावरील व उपविभागावरील पदे लगतच्या उच्चस्तरावर दर्जोन्नत करून संवर्ग संख्या कशी असावी.

(३) सर्वसाधारण धोरणानुसार उपविभागस्तरावर पदोन्नत व सरळसेवा प्रविष्ठांचा एकच संवर्ग करावा किंवा कसे.

मा. मुख्यमंत्री ह्यांचे समवेत झालेल्या बैठकीच्या कार्यवृत्ताप्रमाणे वरील मागण्यांविषयी विचार करताना ज्या-ज्या अभियंत्यांच्या सेवाविषयक बाबींमध्ये परिणाम संभवतो अशा सर्व मान्यता प्राप्त संघटनांचे अभिप्राय समितीने जाणून घेऊन संपूर्ण अभियांत्रिकी सेवेबाबत शिफारशी द्याव्यात.

सदर समिती वरील मुद्यांवर शक्यतो १ महिन्यात शासनास शिफारसी करील.

हा शासन निर्णय सामान्य प्रशासन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक ७७४/१२, दि.०४.०७.२००६ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सही/-

**डी. एल. थोरात,**

शासनाचे सह सचिव.

**प्रत :**

मा.मुख्यमंत्री यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,

मा.मंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,

मा.मंत्री (सार्वजनिक बांधकाम) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,

मा.मुख्यसचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,

मा.अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,

प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,

सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,

सचिव (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,

सचिव (रस्ते), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,

सह सचिव (सेवा) / उप सचिव (आस्था.) / उप सचिव (प्रशा.),जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,

आ. (सं.नि.) कार्यासन संग्रहार्थ.

<u>जोडपत्र-२</u>

**अभियांत्रिकी संवर्गाच्या उन्नयनासाठी प्रस्तावित महत्त्वाचे पदे दर्शविणारा तक्ता.**

**(जलसंपदा विभाग)**

| अ.क्र | कार्यालयाचे नाव | एकुण संख्या | महत्त्वाच्या पदांची संख्या: स.अ.श्रेणी-२ पासून उप विभागीय अभियंता – पदसंख्या | स.अ.श्रेणी-२ पासून उप विभागीय अभियंता – एकूण | उपविभागीय अभियंता पासून कार्यकारी अभियंता – पदसंख्या | उपविभागीय अभियंता पासून कार्यकारी अभियंता – एकूण | कार्यकारी अभियंता अभियंतापासून अधीक्षक अभियंता – पदसंख्या | कार्यकारी अभियंता अभियंतापासून अधीक्षक अभियंता – एकूण | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) | (६) | (७) | (८) | (९) | (१०) |
| **१** | **मंत्रालय** | १ | — | — | २४ | २४ | ११ | ११ | **मंत्रालयातील सध्याच्या ११ अवर सचिव पदांचे उप सचिवांच्या पदामध्ये उन्नयन व्हावे.**<br>* **प्रादेशिक कार्यालयात १ पद अ.अ. दर्जाचे असावे.**<br>* **मंडळ कार्यालयात स.अ.चे पद का.अ. दर्जाचे असावे.** |
| **२** | **प्रादेशिक कार्यालय** | १२ | — | — | ३ | ३६ | १ | १२ | |
| **३** | **मंडळ कार्यालय** | ६० | ३ | १८० | १ | ६० | — | — | |
| **४** | **विभागीय कार्यालय** | ३७० | ४/१ | ३७० | — | — | — | — | |
| **५** | **म.अ.सं.संस्था (मेरी)** | १ | ४० | ४० | ४० | ४० | — | — | |
| **६** | **संकल्पचित्र संघटना (सि.डी.ओ.)** | १ | १५० | १५० | ८० | ८० | — | — | |
| | **उन्नयनासाठी प्रस्तावित पदे** | | | ७४० | | २४० | | २३ | |

**(सार्वजनिक बांधकाम विभाग)**

| अ.क्र | कार्यालयाचे नाव | एकुण संख्या | महत्वाच्या पदांची संख्या: स.अ.श्रेणी-२ पासून उप विभागीय अभियंता – पदसंख्या | स.अ.श्रेणी-२ पासून उप विभागीय अभियंता – एकूण | उपविभागीय अभियंता पासून कार्यकारी अभियंता – पदसंख्या | उपविभागीय अभियंता पासून कार्यकारी अभियंता – एकूण | कार्यकारी अभियंता अभियंतापासून अधीक्षक अभियंता – पदसंख्या | कार्यकारी अभियंता अभियंतापासून अधीक्षक अभियंता – एकूण | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) | (६) | (७) | (८) | (९) | (१०) |
| १ | मंत्रालय | १ | — | — | १५ | १५ | ६ | ६ | मंत्रालयातील सध्याच्या ६ अवर सचिव पदांचे उप सचिवांच्या पदामध्ये उन्नयन व्हावे.<br>* प्रादेशिक कार्यालयात १ पद अ.अ. दर्जाचे असावे.<br>* मंडळ कार्यालयात स.अ.चे पद का.अ. दर्जाचे असावे. |
| २ | प्रादेशिक कार्यालय | ७ | — | — | ४ | २८ | १ | ७ | |
| ३ | मंडळ कार्यालय | २६ | ३ | ७८ | १ | २४ | — | — | |
| ४ | सहाय्यक संशोधन अधिकारी | १९ | १ | १९ | १ | २४ | — | — | |
| ५ | विभागीय कार्यालय | १४० | ४/१ | १४० | — | — | — | — | |
| ६ | विभागीय आयुक्त कार्यालय | ६ | २ | १२ | १ | ६ | — | — | |
| ७ | संकल्पचित्र संघटना | १ | ६० | ६० | ६० | ६० | — | ७ | |
| ८ | प्रतिनियुक्ती (विद्यापीठ महानगर पालिका, किनारा अभियंता, बी. एम. आर. डी. | — | — | — | २५ | २५ | — | — | |
| ९ | सी., एम. एस. आर. डी. सी., | — | — | — | ३३ | ३३ | — | — | |
| | उन्नयनासाठी प्रस्तावित पदे | | | ३०९ | | १९२ | | २० | |

**टीप :** १) उन्नयनासाठी कालबध्द पदोन्नतीचा लाभ मिळालेले अभियंतेच प्रस्ताबित आहेत. सार्वजनिक बाधकाम विभागातील लाभधारक स.अ.श्रेणी-२ व उप विभागीय अभियंता यांची संख्या अनुक्रमे सुमारे ६०० आणि ५०० अशी आहे. तसेच जलसंपदा विभागातील संख्या अनुक्रमे ७५० आणि ८०० अशी आहे.

२) या लाभामुळे त्यांची कुंठीतता सुमारे ४ वर्षाने कमी होणार आहे. त्यानंतर वर्षवार भरती व सेवानिवृत्ती जवळपास समसमान असल्याने कुंठीतता राहणार नाही.

३) पदोन्नत्या सध्याच्या कोटयामध्ये मात्र ज्याना उच्च वेतनश्रेणी प्राप्त आहे. अशा अभियंत्यांमधून अभिप्रेत असल्याने सरळसेवा भरती प्रस्तावित नाही.

४) प्रादेशिक कार्यलय व मंत्रालयातील कार्यकारी अभियंता दर्जाच्या पदांचे उन्नययन करून अधीक्षक अभियंता दर्जामध्ये समावेश करावे असे प्रस्तावित आहे.

# जोडपत्र-३

## इतर राज्यांची माहिती

| | MAHARASHTRA | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | 1. Sectional level-Group B | | | | | 2. Sub-Divisional Level- Group A | | | | 3. Divisional Level- Group A |
| | 1 | 2 | 3 | 4 | 5 | 6 | 7 | 8 | 9 | 10 |
| | 1 | 2 | 3 | 4 | 5 | 6 | 7 | 8 | 9 | 10 |
| Group / Cadre / Posts | Assistant Engineer Grade - II (Graduate Junior Engineer) | Junior Engineer (Diploma holder Junior Engineers) | Sectional Engineer (Diploma holder) | Civil Engineering Assistant (CEA) to Junior Engineer by promotion | Civil Engineering Assistant (CEA) to Junior Engineer by promotion | Assistant Executive Engineer (AEE) (Graduate) | Assistant Engineer Grade-I (AE-I) (Graduate Dy.Engineers) | Sub Divisional Engineer (SDE) (Graduate Dy. Engineers) | Sub Divisional officer (SDO) (Diploma holder Dy. Engineers) | Executive Engineer (EE) |
| Mode of Recruitment | Direct Through MPSC – 25% of Sanctioned post of Junior Engineer's cadre | Direct Recruitment – 75% | By up gradation after completion of 5 yrs service as Junior Engineer | By promotion with 20% quota | By promotion with 5% quota | Direct Recruitment through MPSC – 40% of total Posts of Executive Engineers | Direct Recruitment through MPSC – 34% of total Posts at Sub Divisional level | By Promotion – 33% of sanctioned posts at sub Divisional level | By Promotion – 33% of Post Sanctioned at sub divisional level | By Promotion of – (i) Directly Recruited Assistant Executive Engineer – 40% (ii) Assistant Engineer Grade-1 (AE-1) – 25% (iii) Sub Divisional Engineer (SDE) – 25% (iv) Sub Divisional Officer (SDO) – 10% |
| Minimum Qualifying Service for Direct Recruitment/ Promotion | Direct Recruitment | Direct Recruitment | Upgradation | I.T.I. Course of Technical Assistant or equivalent post for 1 or 1 ½ years by absorption in cadre of Civil Engineering Assistant | Those C E As who have completed course though distant education | Direct Recruitment trough Maharashtra Public Service Commission | Direct Recruitment | Assistant Engineer Grade- II – 3 years | Sectional Engineer – 8 years | i) Assistant Executive Engineer – 4 yr. ii) Assistant Engineer Grade-1 to Ex.Engr.– 7 yr. iii) Sub Divisional Engineer to Ex. Engr. – 7 yr iv) Sub Divisional Officer to Ex. Engr. – 10 yr. |
| Pay Scale | 6500-10500 | 5500- 9000 | 6500-10500 | 5500 – 9000 | 5500 – 9000 | 8000-13500 Higher Start Rs.8550 | 8000-13500 | 8000-13500 | 8000 – 13500 | 10650 – 15850 |
| Proportion | 25% (Direct Recruitment) | 75% (Direct Recruitment) | Same as above as it is & upgradation from J.E. to Sectional Engineer | 20% by promotion (out of 75 % Diploma holder Junior Engineers) | 5% by promotion (out of 75 % Diploma holder Junior Engineers) | Direct Recruitment in the Executive Engineer Cadre. | 34:33:33 (Direct 34% and Promotion 66%) | - | - | 40:60 |

| | CPWD | | | |
|---|---|---|---|---|
| | Sectional Level Group B | Sub-Divisional Level Group B | Divisional Level Group A | |
| | 1 | 2 | 3 | 4 |
| | 11 | 12 | 13 | 14 |
| Group / Cadre / Posts | Junior Executive Engineer, Group- C | Assistant Executive Engineer, Group B | Assistant Executive Engineer ,Group A | Executive Engineer, Group A |
| Mode of Recruitment | 1) Direct recruitment -95% 2) Limited Deptl Exam.- 5% | 1) Promotion -50% 2) Ltd. Deptl Exam – 50% | By direct recruitment through UPSC | By promotion- 1) AEE.-33 1/3%, 2) AE -33 1/3%- degree. 3) AE -33 1/3% |
| Minimum Qualifying Service for Direct Recruitment/ Promotion | For Limited Deptl Exam- Five years regular service in the grade. | 1) As JE 6 years regular service 2) for Ltd. Deptl Exam 4 year regular service. | Direct Recruitment | 1) 4 years as AEE . 2) 8 years as AE in the grade and possessing degree or any other equivalent qualification. 3) 10 years as AE in the grade and possessing Diploma or any other equivalent qualification. |
| Pay Scale | 5000-8000 | 6500-10500 | 8000-275-13500 | 10000-15200 |
| Proportion | - 95% by Direct recruitment - 5% By LDCE | Promotion - 50% - LDCE — 50% | 100% - Direct Recruitment | Direct 33% and Promotion 67% |

| | GUJARAT | | | |
|---|---|---|---|---|
| | Sectional Level Group B | Sub-Divisional Level Group B | Divisional Level Group A | |
| | 1 | 2 | 3 | 4 |
| | 15 | 16 | 17 | 18 |
| Group / Cadre / Posts | Additional Assistant Engineer Class-III. | Assistant Engineer Class-II - B.E.(Civil) | Deputy Engineer (Civil) Class-II | Executive Engineer (Civil) G.S.E. Class-I |
| Mode of Recruitment | i) By transfer of a pension working on work charged establishment as work supervisor (Civil) - 15% ii) Direct - Age relax. for in-service candidates - 85% | Direct only | 1) Direct through GPSC --B.E.(Civil) 20% and 2) Promotion – 80% amongst i) J.E. (Civil), ii) supervisor (Civil),iii) Overseer (Civil) in the ratio of 7:4:1. | 1) By direct recruitment B.E (Civil) - 20% and 2) By promotion - 80% |
| Minimum Qualifying Service for Direct Recruitment/ Promotion | By Transfer - 5 years on work charged establishment. | -- | For promotion - i) For J.E. (Civil) - 3 years , ii) For supervisor (Civil- 8 yrs, iii) For Overseer (Civil)- 13 yrs. | For promotion - 7 years as Deputy Executive Engineer (Civil). |
| Pay Scale | Rs. 5500-9000 | Rs. 6500-10500 | Rs. 8000-13500 | Rs.10000-15200 |
| Proportion | 85:15:00 | 100% Direct. | Dir : Promotion 1:4(7:4:1) | 1:4 one by D.R. & 4 by Promotion |

| | Chennai | | | | Karnataka | | | | | CWC | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | Sectional Level Group B | | Sub-Divisional Level Group B | Divisional Level Group A | 1. Sectional level-Group B | | | Sub Divisional Level | 3. Divisional Level Group A | Sectional Level Group B | | Sub-Divisional Level Group B | Divisional Level Group A |
| | 1 | 2 | 3 | 4 | 1 | 2 | 3 | 4 | 5 | 1 | 2 | 3 | 4 |
| | 19 | 20 | 21 | 22 | 23 | 24 | 25 | 26 | 27 | 28 | 29 | 30 | 31 |
| **Group / Cadre / Posts** | **A. Assistant Engineer (Degree Holder)** | **B.Supervisor (Junior Engineer) (Diploma holder)** | **Assistant Executive Engineer ( Degree holder)** | Executive Engineer | Assistant Engineer ( Graduate ) | Junior Engineer (Diploma holder) | Sectional Engineer (Diploma holder)<br>----------<br>Junior Engr. Special grade | Assistant Executive Engineer (Division-I (Graduate) | Executive Engineer (EE)/ Deputy Chief Engr | **Junior Engineer, (Civil /Mech)** | **Assistant Engineer / Extra Assistant Director** | **Assistant Executive Engineer / Assistant Director ( Junior Time Scale ) **** | **Deputy Director / Executive Engineer** |
| **Mode of Rectuit ment** | **i) Direct Recruitment through T N P S C.<br>ii) By transfer from Junior Engineer, Overseers, Head Draughtsman or Civil Draughtsman (With Diploma Qualification** | i) Promotion from---verseers or Tech Assts or Draughtsman Grade II<br>ii) Direct Recruitment (if no qualified and Suitable candidate is available by promotion )<br>III) For Special Reasons recruitment by transfer from any ther service. | i) Promotion from the post of Assistant Engineer.<br>ii) Recruitment by transfer from post of Junior Engineers, Head Draughsman Grade I of Tamil Nadu Engineering Subordinate Service. | Promotion from the post of Assistant Executive Engineer | By direct recruitment through Karnataka Public Service Commission . Or<br>ii) By transfer of a Junior Engineer | By direct recruitment through Karnataka Public Service Commission. | No such Sect..E .cadre exists.<br>By promotion From the cadre of Jr.Engr. | i) 75% by promotion from the cadre of "Assistant Engineers, &<br>ii) 20% by direct recruitment . &<br>iii) 5% by direct recruitment from among persons ( in service) belonging to Karnataka Public works Engg. Deptt. | By promotion from the cadre of Assistant Executive Engineer Division-I | i) Direct recruitment (Degree or Diploma) – 95%<br>ii) Promotion --5% | By Promotion - 100% (graduate JE 50% and diploma JE-50%) | 1) by Direct recruitment - 50% and<br>2) By Promotion – 50% | By Promotion - 100% |
| **Minimum Qualifying Service for Direct Recruit ment/ Promo tion** | 10 years or period of 3 years after acquiring the prescribed education qualification (Amendment of this provision is under the consideration of the Government of Tamil Nadu) | 4 years in the case of diploma holding Overseer or Technical Assistant or Draughtsman Grade II and 8 years in the case of others. | 1) 5 years of service as Assistant Engineer.<br>2) Junior Engineer-10 Years<br>3) Head Draughsman and Draughsman Grade 1 - 23 years including 3 years filed experience in Junior Engineer. | Must have rendered service as Assistant Executive Engineer for not less than five years. | --- | Diploma in Civil Engineering or equivalent qualification. | 8 years as J.E. | i) Degree<br>ii) 5 Years as Asstt.Engr. Relaxation of 2 years is provided. | 5 years as Assistant Executive Engineer Division-I | <u>Promotion</u> :-<br>As Surveyors 8 years regular service in the grade and possessing educational qualification prescribed for direct recruits or Surveyors with 8 years regular service in the grade and having passed the departmental examination or Surveyors with 12 years regular service in the grade subject to clearance by DPC. | <u>Promotion</u> :-<br>i) Graduate Junior Engineers - 3 years'<br>ii) Diploma holdr Junior Engineers - 7 years' regular service in the grade. | <u>Promotion</u> :-<br>From Extra Assistant Directors (Engineering) / Assistant Engineers with five years regular service in the grade. | 4 year as Officer in the Junior Time Scale post. |
| Pay Scale | 6500-200-11100 | 5500-175-9000 | 8000-275-13500 | 10000-325-15200 | Rs. 11400-300-12300-350-14400-400-16800-450-19500-525-21600 | Rs. 8825-225-9500-250-10500-300-12300-350-14400-400-16000 | - | Rs. 14050-350-1440-400-16800-450-19500-525-22650-600-25050 | Rs. 18150-450-19500-525-22650-600-26250-675-26925 | 5000-150-8000 | 6500-200-10500 | 8000-275-13500 | 10000-15200 |
| Proportion | - | - | 1) 3:1 from Assistant Engineer and by transfer from JE Head Draughtsman Grade I resp. ii) 4:1. 4 posts by transfer from JE and 1 by transfer from Head Draughtsman and Draughsman Grade I. | - | 100% by direct recruitment | 100% by direct recruitment | 100% by promotion | As Above | 100% by promotion | Direct : Promotion 95: 5 | 100% by promotion. However, the existing service rules are under review. | Direct : Promotion : 1 : 1 | 100% by promotion |

## जोडपत्र ४

**सध्याच्या १९७० च्या नियमाप्रमाणे अभियांत्रिकी सेवा संवर्गाचा आलेख**



**जोडपत्र-५**

## प्रस्तावित सुधारणेनुसार अभियांत्रिकी सेवा संवर्गाचा आलेख

